# नवभारत

वर्ष १० वें ] जानेवारी १९५७ [ अंक ४



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका















नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका







   







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष दहावें | अंक चौथा

# नवभारत

जानेवारी १९५७

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, ४४६ शीव रोड, मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( ज. सातारा )

# 'नवभारत' मासिक, जानेवारी १९५७

## —लेखक-परिचय—

**प्रा. सु. खं. मुरंजन** – मुंबईच्या सिडनहॅम कॉलेजचे प्राचार्य; टॅरिफ कमिशनचे सभासद : कटक येथील अ. भा. अर्थशास्त्रपरिषदेचे अध्यक्ष (१९५६); प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ; Banking in India; Shadows of Hyper-Inflation in India वगैरे ग्रंथांचे लेखक.

**डॉ. एच्. डी. सांकळिया** – पुणें येथील डेक्कन कॉलेज ॲन्ड पोस्टग्रॅज्युएट इन्स्टिट्यूटचे डायरेक्टर.

**डॉ. ग. मा. कुरुलकर** – मुंबई येथील गो. सुं. मेडिकल कॉलेजमधील शरीररचनाशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. म. वि. मिराशी** – नागपूर येथील सरकारी विज्ञान महाविद्यालयांत वनस्पतिशास्त्राचे प्राध्यापक, वनस्पतिशास्त्रासंबंधीं तरुणभारत, सुषमा इत्यादि नियतकालिकांतून स्फुट-लेखन.

**प्रा. भा. कृ. आपटे** – मुंबई येथील एल्फिन्स्टन कॉलेजमधील इतिहासाचे प्राध्यापक.

**श्री. गं. रा. पटवर्धन** – एम्. ए., आय्. ए. एस्. – कलकत्ता येथें मध्यवर्ती खात्यांतील अधिकारी.

**श्री. म. वि. भिडे** – (पुणें). आय्. सी. एस्. सेवानिवृत.

---

प्रा. सुमंत मुरंजन

# भारतीय आर्थिक विकासाचा प्रश्न

## विकाससिद्धान्ताचा अभाव

आर्थिक विकासाचे मूलभूत घटक शोधण्याच्या व तपासण्याच्या कार्यांत अर्थशास्त्रज्ञांना अजून पुष्कळच पुढें जावयास हवें. आणि त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहींहि नाहीं. आर्थिक विकासाचा सिद्धान्त वा नियम निश्चित करण्याच्या मार्गांतील अडचणींचें स्वरूप नैतिक, मानसिक व सामाजिक विकासनियम ठरविण्यांतील अडचणींसारखेंच आहे. इतरांच्या मानानें अर्थशास्त्राची अवस्था कांही प्रमाणांत बरीच म्हटली पाहिजे. आर्थिक विकास कशास म्हणायचें यासंबंधी विशेष महत्त्वाचे मतभेद नाहींत. आणि विकासाचे मोजमाप करणारे बहुतांशीं बरोबर असलेले निर्देशांक आपणांस दाखवितां येतात हें आपलें एक बहुमोल वैशिष्ट्य होय.

आर्थिक विकास ही कांही एखाद्या हवारहित पोकळींत घडून येणारी घटना नाहीं. कालमानाप्रमाणें बदलत जाणाऱ्या विशिष्ट राजकीय, कायद्याच्या व सामाजिक चौकटींतच तो घडून येत असतो. आजच्या काळांत मुक्त साहस व स्पर्धेच्या वातावरणांत आर्थिक विकास होऊं द्यावयाचा कीं नियोजन पद्धतीनें तो घडवून आणावयाचा असा प्रश्न आपणापुढें आहे. तथापि या दोन पद्धतींतील सीमारेषा स्पष्ट नाहीं आणि ती कधींहि स्पष्ट होणार नाहीं. कारण तो बहुतेक अंशात्मक प्रश्न आहे. तथापि या निवडीचें स्वरूप मुख्यत्वें आर्थिक असल्यामुळें तिच्यांतून आणखी दोन प्रश्न निर्माण होतात. नियोजित आर्थिक विकास हा मुक्त साहस व स्पर्धा यांजवर आधारलेल्या विकासापेक्षां अधिक इष्ट होय अशी अपेक्षा कां बाळगली जाते ? आणि दुसरें म्हणजे विकासाच्या निरनिराळ्या स्वरूपांत निवड करतां येणें ही घटनाच मुळीं आर्थिक विकासाचे नियम हे भौतिक शास्त्रांतील नियमाहून भिन्न असणार हें सूचित करीत नाहीं काय ? तथापि हा दुसरा प्रश्न तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान यांच्या अत्यंत वादग्रस्त क्षेत्रावर सोपविणेंच युक्त होईल.

## नियोजनच कां ?

नियोजित अर्थव्यवस्थेंत विकासाची गती वाढते म्हणून इतर अर्थव्यवस्थेपेक्षां नियोजन अधिक स्वीकार्य होय असें एक कारण सांगितलें जातें. तथापि तसें म्हणावयाचें झाल्यास अमेरिकेची अर्थव्यवस्था काय किंवा भारतीय अर्थव्यवस्था काय, विकासाच्या कोणत्याहि पातळीवरील अर्थव्यवस्थेला हें विधान लागूं झालें पाहिजे. सामान्यतः मान्य असलेल्या पद्धतीनुसार विकासाची सामाजिक दृष्ट्या ठरणारी श्रेणी नफ्यावर आधारलेल्या खाजगी निर्णयांतून ठरणाऱ्या श्रेणीपेक्षां नेहमींच चांगली असते असें म्हटल्यास वरील भूमिका घेतां येईल. सामाजिक विकासश्रेणीच्या मुळाशीं असलेले निर्णय हे खाजगी भांडवलदारांच्या निर्णयापेक्षां अधिक योग्य व विश्वासार्ह असतात असा दावा करणें शक्य आहे. किंवा नफ्यावर आधारलेल्या विकासश्रेणींत सत्ता व संधी यांच्या विषमतेंतून उद्भवलेली प्रस्थापित प्राप्तीची विभागणी प्रतिबिंबित झाली असल्यानें ती विकासश्रेणी मुळांतच विकृत असते असेंहि म्हणतां येईल. तथापि या दुसऱ्या बाबतींत नियोजन हा उपाय नसून करांच्या व अन्य मार्गांनें सत्तेची व संधीची विषम विभागणी नाहींशी करणें हेंच योग्य होय.








तथापि सामाजिक विकासश्रेणी ही खाजगी नफ्यावर आधारलेल्या विकासक्रमाहून स्वभावत:च अधिक इष्ट असते हें अमान्य केलें तरी देखील विशिष्ट परिस्थितींत तिला खास महत्त्व असणें शक्य आहे. कित्येक राष्ट्रांमध्यें उत्पादनसाहस करणाऱ्या व्यक्ति, संशोधनाची व सुधारणेची वृत्ति, आणि भांडवली विनियोगासाठीं मोठ्या प्रमाणांत संचय, हीं सर्व भरपूर प्रमाणांत असून देखील त्यांना पुढें जातां आलें नाहीं. कारण आधींच अत्यंत मोठ्या स्वरूपाच्या बाह्य–काटकसरीचा विकास केलेल्या राष्ट्रांशीं त्यांना झगडावयाचें होतें. मुळांतील आंग्ल अर्थशास्त्राचें ( Classical ) नसलें तरी परंपरागत अर्थशास्त्राचें या कालांतर दर्शविणाऱ्या परिस्थितीला ' संरक्षण व जकाती ' असें उत्तर आहे. तथापि बाह्य–काटकसर जर उत्पादनकार्याला मिळणारी सामाजिक साधनसामग्री, आर्थिक साधनसामग्री ( Overheads ) आणि परस्परावलंबी व पूरक उद्योगधंद्यांची प्रमाणबद्ध वाढ यांतून निर्माण होत असेल तरच संरक्षक जकातींचा विशिष्ट उद्योगधंद्यांच्या बाबतींत उपयोग होऊं शकतो. त्यामुळें वरील परिस्थितींत खाजगी साहस व स्पर्धा यांच्या ऐवजीं नियोजित भांडवली विनियोग हेंच खरें प्रभावी उत्तर होय हें उघड आहे.

## अर्धविकसित राष्ट्रांचा प्रश्न

आर्थिक विकासांत केवळ काळाच्या अंतरामुळें इतक्या मोठ्या अडचणी उत्पन्न होतांना दिसतात. यामुळें अर्धविकसित राष्ट्रांची अवस्था तर आत्यंतिक टोकाची अवस्थाच म्हटली पाहिजे. कारण त्यांच्या जवळ ना साहसी व्यक्ती, ना संशोधन वा सुधारणेची वृत्ति, ना भांडवली विनियोगासाठीं लागणारा संचय ! सामाजिक व आर्थिक साधनसामग्री निर्माण करणें ही आर्थिक विकासाची केवळ पहिली व प्राथमिक पायरी होय. त्याहूनहि अधिक कठीण प्रश्न म्हणजे तंत्रविद्येचा ! तंत्रविद्येची प्रस्थापित पातळी कायम राखून भांडवली विनियोगाचें प्रमाण वाढविल्यास दारिद्र्य लवकर कमी होण्याची शक्यता निर्माण होते खरी, परंतु नवीन विनियोगासाठीं अतिरिक्त संपत्ति निर्माण होणें शक्य नाहीं. उलट तंत्राच्या सुधारणेमुळें अतिरिक्त संपत्ति मिळेल, पण बेकारी वाढण्याचीहि त्यांत भीति आहे. बाह्य जगापासून संपूर्ण अलिप्त असलेल्या एखाद्या अर्थव्यवस्थेमध्यें मध्यम दर्ज्याच्या तंत्राचा अवलंब करणें शक्य आहे. परंतु व्यवहारांत व विशेषत: बाह्य जगाशीं संबंध असतांना खरा पर्याय म्हणजे मागासलेलें तंत्र आणि त्याजबरोबर मागासलेलें राहणीमान यांचा स्वीकार करणें किंवा अद्ययावत उपकरणें आणि आनुषंगिक बेकारी हा धोका पत्करणें हाच होय. अर्धविकसित आणि पूर्णविकसित प्रदेश, त्याचप्रमाणें सुधारलेली आणि मागासलेली तंत्रयोजना यांच्या परस्पर संबंधांविषयींचा अर्थशास्त्रीय विचार अजून निश्चित झालेला नाहीं. मध्यम प्रतीच्या साधनांकडून हळू हळू सुधारलेल्या साधनांकडे आगेकूच करणें असें कांहीसें तात्त्विक उत्तर या प्रश्नाला देतां येईल, परंतु या बाबतींत बरेंच संशोधन होणें अगत्याचें आहे. आर्थिक प्रेरणांमुळ अशा तंत्रांचा वापर कितपत होतो, किंवा होत नसल्यास, कां होत नाहीं या प्रश्नाला अजूनहि समाधानकारक उत्तर मिळत नाहीं. देशांत उपलब्ध असलेली नियोजकता आणि साहसशक्ति व विशेषत: तिचा दर्जा यावर ही गोष्ट बऱ्हंशीं अवलंबून असते. अद्ययावत् तंत्रांच्या खर्चघटकांचें शास्त्रीय पृथक्करण होणें, ही अर्धविकसित राष्ट्रांची तांतडीची गरज आहे. कारण यावरूनच ह्या मधल्या अवस्थेंत शक्य होईल तेथें या साधनांचा उपयोग करूनहि किफायतदार रोजगारी वाढविणें कितपत शक्य आहे हें ठरवितां येईल.

## नियोजनांचीं उपकरणें

आर्थिक नियोजनामागील तत्त्विक अधिष्ठान कांहीहि असो. पण नफ्याचा निर्देशांक काढून टाका–







यचें म्हटलें कीं भांडवली विनियोग किंवा आर्थिक परिश्रमामागील प्रेरणा अजमावण्यासाठीं दुसऱ्या एखाद्या तितक्याच कार्यक्षम निर्देशांकाची योजना करणें क्रमप्राप्त होतें. कोणत्याहि आर्थिक परिश्रमामागील उद्दिष्ट, उत्पादन आणि रोजगारी वाढविणें हेंच असतें. अर्थातच नियोजनमंडळाचें लक्ष उत्पादन-साधनांची योग्य ती जुळवणी करून उत्पादन आणि व्यवसाय जास्तीत जास्त वाढविण्याकडे असतें. भांडवली विनियोग आणि उत्पादन, भांडवलीविनियोग आणि रोजगारी, प्राप्ती आणि उपभोग, उत्पादन वस्तू आणि उपभोग्य वस्तू, उत्पादन आणि वाहतूक, उत्पादन आणि परराष्ट्रीय व्यापार यामधील अन्योन्य संबंधांवर आधारलेल्या गुणोत्तरांवरच ( Ratio ) नियोजन-अधिकाऱ्यांना विसंबून राहावें लागतें. हे निर्देशांक अर्थशास्त्रज्ञांच्या चांगल्याच परिचयाचे आहेत. तरी पण त्यांचें आंकडेशास्त्रीय नाहीं तरी तात्त्विक विवेचन करायला हवें. आंकडेवारीचा आपणाला फार तर स्पष्टीकरणात्मकच उपयोग करतां येईल. त्यांतून बरीचशी आंकडेवारी जुनी म्हणून निरुपयोगी ठरणारी आहे. तसेंच एका अर्थव्यवस्थेंतील तपशिलावर आधारलेले निर्देशांक दुसऱ्या अर्थव्यवस्थेला लागू करणें योग्य होणार नाहीं. आणि शिवाय या सर्व गोष्टी जरी जुळून आल्या तरी उपलब्ध आंकडेवारी इतकी सदोष आहे कीं अनभिज्ञ माणसानें तिच्या वाटेस जाऊं नये हेंच योग्य.

## भांडवली-विनियोग आणि उत्पन्न

आर्थिक विकासाच्या प्राथमिक अवस्थेमध्यें भांडवली विनियोग आणि उत्पन्न यांतील प्रमाण खूपच मोठें असतें, त्यानंतर तें थोड्या काळपर्यंत स्थिरावतें आणि शेवटीं विकासाच्या शेवटच्या अवस्थेंत तें खालीं येऊं लागतें, असें मानण्यांत येतें. विकसित अर्थव्यवस्थेमध्यें राष्ट्रीय उत्पन्नांत ३ टक्के वाढ होण्याकरितां भांडवली विनियोग १५ टक्क्यांनी वाढवावा लागतो असें म्हणतात. भांडवली विनियोग आणि उत्पन्न यामागील या अन्योन्य संबंधामागें एक गृहीतकृत्य मानलें आहे. तें असें कीं, विकासाच्या पहिल्या अवस्थेंत उपभोग्य वस्तू निर्माण करणाऱ्या उद्योगधंद्यांचें वर्चस्व असतें. उत्पादकवस्तू निर्माण करणाऱ्या उद्योगधंद्यांसाठीं भांडवली विनियोग मोठ्या प्रमाणावर करावा लागतो, त्या प्रमाणांत उपभोग्य वस्तू निर्माण करणाऱ्या धंद्यांना भांडवलाची गरज कमी असते. तेव्हां प्रस्तुतचें अनुमान नव्यानेंच वसाहत झालेल्या देशांच्या बाबतींत अगदीं खरें ठरतें. या देशांमध्यें उपभोग्यवस्तूंचें उत्पादन उत्पादकवस्तूंच्या अगोदर व्हावें लागतें. इतर कोणत्याहि वस्तूंपेक्षा अन्नाचें उत्पादन आधीं व्हावें लागतें. परंतु प्राधान्यतेचा हा अनुक्रम पुढारलेल्या देशाला लागू होतो का ? आर्थिक अग्रेसरत्व म्हणजेच नवीन तंत्राचा अंगीकार होय. पण नवीन तंत्राचा उपयोग करणें केवळ मोठ्या प्रमाणावरील भांडवली विनियोगावर अवलंबून असतें. भारतामध्यें जीवनमान अतिशय खालच्या पातळीवर स्थिरावलेलें आहे. पण त्याचबरोबर राजकीय परिस्थितीमुळें सुधारलेल्या तंत्राची तोंडओळखहि झालेली आहे. भारतासारख्या देशांना हा विकासाचा क्रम लागू पडेल कां ? मनुष्यबळ अमाप असल्यामुळें कमी भांडवल लागणाऱ्या व उपभोग्य वस्तूंचें उत्पादन करणाऱ्या धंद्यांना चालना मिळावी हें उघड आहे; परंतु आर्थिक विकासाचा अभाव, त्याचप्रमाणें नियोजित उद्दिष्ट या दोन्ही गोष्टींमुळें भांडवली विनियोग प्रामुख्यानें सामाजिक आणि आर्थिक वरखर्च यांवर केंद्रित केला जाण्याची शक्यता आहे. घरबांधणी, वाहतूक, शिक्षण इत्यादीच्या बाबतींत भांडवल व उत्पादन यांचें परस्पर प्रमाण लहान राहाणें शक्य आहे. इतर वस्तूंपेक्षां उपभोग्य वस्तूंना एक प्रकारें नैसर्गिक वर्चस्वच प्राप्त होत असतें अथवा कमी भांडवल लागणाऱ्या आणि उपभोग्यवस्तूंचें उत्पादन करणाऱ्या उद्योग-

धंद्यांना आर्थिक कारणांमुळें प्राधान्य मिळतें आणि म्हणून उपभोग्य वस्तूंचें उत्पादन करणाऱ्या धंद्यांना अग्रमान मिळतो असेंच कांही नाहीं. उत्पादन-साधनांची विपुलता हा स्वस्त उत्पादनाच्या शक्यतेंतील एक घटक होय. मोठ्या बाजारपेठेमुळेंहि निरनिराळ्या प्रकारची काटकसर शक्य होते व उत्पादनाची किंमत बरीच कमी करतां येते. अलिप्त अर्थव्यवस्थेमध्यें उपभोग्य वस्तूंच्या उत्पादनाला मोठ्या बाजारपेठेचा हा असा फायदा मिळतो; परंतु परदेशीय बाजारपेठांचा अन्तर्भाव केला तर आर्थिक विकासाचा क्रम इतका निश्चित आणि सुसंगत राहणें तेवढेसें शक्य नाहीं.

तेव्हां भांडवली विनियोग आणि उत्पन्न यांतील परस्पर संबंधाविषयीं कोणतेंहि समीकरण बांधणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें विकसित आणि अर्धविकसित अर्थव्यवस्थांत भांडवल आणि उत्पादन यांमध्यें संभवणाऱ्या तुलनात्मक प्रमाणासंबंधी अनुमानें बांधणेंहि सुरक्षित नाहीं.

पहिल्या पंचवार्षिक योजनेप्रमाणें भांडवली विनियोग आणि त्यापासून वाढणारें राष्ट्रीय उत्पन्न यांचें प्रमाण अंदाजी १०८:१ असें साधारणपणें पडतें. हें प्रमाण फारच मोठें आहे. याचा दुसरा अर्थ असा कीं १९५०-५१ ते १९५५-५६ पर्यंतच्या काळांत राष्ट्रीय उत्पन्नांत जी सर्वसाधारण ३ टक्के भर पडली, त्याकरितां राष्ट्रीय बचत व भांडवली विनियोग दरवर्षी ७·३ टक्के या प्रमाणांत वाढविणें क्रमप्राप्त होतें. या ठिकाणीं राष्ट्रीय उत्पन्नांतील वाढीचा आपण धरलेला अंदाज सर्वसाधारणपणेंच बरोबर असणार हें विसरून चालणार नाहीं. शिवाय, योजनेच्या काळामध्यें झालेल्या एकंदर विनियोगामध्यें आपण स्वायत्त ( Autonomous ) आणि प्रत्यक्ष भांडवली विनियोग, त्याचप्रमाणें योजनेबाहेर झालेला भांडवली विनियोग अंतर्भूत केलेला नाहीं.

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेनुसार हेंच तुलनात्मक प्रमाण अंदाजी २·३ : १ असें पडणार आहे. राष्ट्रीय उत्पन्न दरवर्षी ५ टक्क्यानें वाढायचें असेल तर भांडवली विनियोग राष्ट्रीय उत्पन्नाच्या १० टक्क्यांपेक्षाहि कांहींसा जास्त होणें क्रमप्राप्त आहे. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत मूलभूत आणि उत्पादक उद्योगधंद्यांवर बराच भर देण्यांत आलेला आहे ही गोष्ट लक्षांत घेतां हें प्रमाण फार मोठें कां आहे हें सहज लक्षांत येईल. तरीहि इतर देशांतील एकंदर अनुभव पाहतां हें प्रमाण अतिरिक्तच आहे असें म्हणावें लागतें.

## उत्पादक–उपभोग्य वस्तूंचें प्रमाण

भांडवली विनियोगाच्या मर्यादा निश्चित झाल्यानंतर योजनाकारांपुढें त्याचें उत्पादक उद्योगधंद्यांसाठीं व उपभोग्यवस्तू निर्मितीच्या धंद्यांसाठीं कोणत्या प्रमाणांत विभाजन करायचें हा महत्त्वाचा प्रश्न उभा राहतो. उत्पादक वस्तूंची आयात करून सर्वच्या सर्व भांडवल उपभोग्य वस्तू निर्माण करण्याकरितां वापरायचें ही कल्पना अशक्य नाहीं. मात्र रस्ते, रेल्वे, हॉस्पिटलें किंवा अन्य बांधकामाच्या सामग्रीच्या बाबतींत हें शक्य होणार नाहीं. परंतु राजकीय आणि सामाजिक अडचणी दूर केल्या, तरी अर्थशास्त्रीयदृष्ट्या नैसर्गिक संपत्तीचा किंवा साधनांचा विचार करूं पाहतां ही गोष्ट समर्थनीय होणार नाहीं. तेव्हां आपण असें धरून चालूंया कीं, नियोजनमंडळ कांही कसोट्यांच्या आधारावर मध्यम वा उत्पादक उद्योगधंद्यांची निवड उपभोग्य वस्तू निर्माण करणाऱ्या उद्योगधंद्यांच्या किंवा नैसर्गिक संपत्तीच्या अनुषंगानें करूं शकतें. व त्यानुसार भांडवली विनियोग योजनाबद्ध होईल याची खबरदारी घेतें. उत्पादक उद्योगधंदे व उपभोग्य वस्तू निर्माण करणारे धंदे यांच्या परस्पर प्रमाणाबद्दल जर कांही तात्त्विक अथवा प्रत्यक्ष अनुभवसिद्ध असे कांही नियम घालतां आले तर नियोजनाच्या दृष्टीनें तें फारच प्रगतिकारक ठरणार आहे.

परंतु या संदर्भांत कांही प्राथमिक स्वरूपाच्या अडचणी उभ्या राहतात. पहिली अडचण अशी

कीं उत्पादक वस्तू आणि उपभोग्य वस्तू यांमध्यें निश्चित सीमारेषा काढतां येईल कां ? ही अडचण अर्थशास्त्राच्या अगदीं प्रारंभापासूनची आहे. पण मार्गदर्शनाखातर म्हणून कांहीं प्रमुख उपभोग्य वस्तूंची व उत्पादक वस्तूंची यादी केली तरी ही अडचण बरीचशी दूर होऊं शकेल आणि ज्या वस्तू अगदीं सीमारेषेवरतींच येतील त्यांच्याहि बाबतींत कांहीं व्यावहारिक निर्णय घेतां येणें अशक्य नाहीं. यापेक्षां महत्त्वाची जी बाब आहे ती अशी कीं, उपभोग्यवस्तूंची एका ठराविक प्रमाणांत निर्मिती व्हायला भांडवली विनियोगाचा विस्तार केवढा व्हायला हवा ? या प्रश्नाचा विचार करूं गेल्यास आपण एका वैचारिक चक्रव्यूहांतच गुरफटले जाऊं लागतों.

उपभोग्यवस्तूंची जर एखाद्या ठराविक प्रमाणांत वाढ व्हावयाची असेल तर त्याहून कितीतरी पटीनें अधिक भांडवली विनियोग व्हावा लागेल असें सर्वसाधारणपणें म्हणतां येईल. उपभोग्यवस्तूंचें उत्पादन वाढविण्याकरितां प्रथमतः उपभोग्य वस्तू निर्माण करणाऱ्या उद्योगधंद्यांतील कारखान्यांची संख्या वाढायला हवी. शिवाय जुनीं आणि निरुपयोगी झालेलीं यंत्रें दूर करण्याकरितां उत्पादक उद्योगधंद्यांना आपलें उत्पादन वाढवायला हवें तें निराळेंच. व्यापारचक्राच्या काळामध्यें उत्पादक उद्योगधंद्यांना चढ उताराची झळ फार लागते याचें वास्तव कारण हें आहे.

वस्तूवस्तूंमध्यें जर एखादी वस्तू अधिक टिकाऊ असेल तर ती निर्माण करण्यासाठीं भांडवली विनियोग जास्त करावा लागतो ही अनुभवसिद्ध वस्तुस्थिति आहे. उपभोग्यवस्तू निर्माण करायला लागणाऱ्या उत्पादक वस्तू ह्या त्या उपभोग्यवस्तूंपेक्षां अधिक टिकाऊ असायला हव्या. उपभोग्यवस्तूंची निर्मिती बराच काळपर्यंत त्याच यंत्रापासून करावी लागते. मध्यम प्रतीच्या वस्तू निर्माण करणाऱ्या उत्पादक वस्तू तर याहूनहि अधिक टिकाऊ असणार, कारण या मध्यम प्रतीच्या वस्तूंचें उत्पादन ही यंत्रणा बराच काळपर्यंत करीत राहते. उत्तरोत्तर वाढणारी यंत्रांची शक्ति आणि अचूकपणा यामुळें उत्पादक वस्तू अधिकाधिक अवजड आणि टिकाऊ बनत जातात असा इतिहासाचा दाखला आहे. ‘ उत्पादनाचा काल ’ आणि नफ्याशीं निगडित असलेला त्याचा ‘ कमीजास्तपणा ’ यासंबंधीं प्रा. हायेक आणि प्रा. नाइट यांच्यामध्यें जो थोडासा विलक्षण आणि कांहीसा संदिग्ध वाद झाला त्या वादांतूनहि फार तर हेंच प्रस्थापित केलें गेलें असें म्हणतां येईल.

उपभोग्य वस्तूंवरील भांडवली विनियोग आणि उत्पादक वस्तूंवरील भांडवली विनियोग यांमधील प्रमाण जर नियोजनकारांना निश्चित करायचें असेल तर तत्पूर्वीं त्यांनीं प्रचलित उपभोगाचा आणि त्याबरोबर भविष्यांत त्या उपभोगांत होणाऱ्या अपेक्षित बदलाचा सर्वांगीण विचार करायला हवा. या प्रमाणाबाबत कांही देशांतील माहिती उपलब्ध आहे. परंतु या देशांचा विकास होत असतांना स्वतंत्र आणि विस्तृत बाजारपेठा अस्तित्वांत होत्या. आज मात्र बाजारपेठा बऱ्याच प्रमाणांत नियंत्रित असल्यामुळें पूर्वीइतक्या सुलभतेनें उपलब्ध होणार नाहीत. उत्पन्न वाढत असतांना सामाजिक उपभोगाची एकंदर रचना कशी असूं शकेल यासंबंधीं दोन सर्वसाधारण तत्त्वें सांगतां येतील. प्राप्ति किंवा उत्पन्न बराच काळपर्यंत जर सतत वाढत गेलें तर अन्नधान्य, पाव, पादत्राणें, इतकेंच नव्हें तर मद्याच्याहि बाबतींत उपभोगाचा ताठरपणा खूपच असतो. उपभोगाचा सर्वांत जास्त वाढावा घरें, लांकडी सामान, साखर आणि मिठाई, कागद आणि छपाई इत्यादींच्या बाबतींत आढळून येतो. त्याचप्रमाणें सामाजिक प्रगतीच्या अनुरोधानेंहि सर्वसामान्य वस्तू आणि सुखसोयी यांच्या उपभोगाचें प्रमाण अधिका-

धिक वाढत जातें. कालमानानें आज चैनीची वाटणारी वस्तू उद्या गरजेची, आवश्यक वस्तू बनते. विद्युत्शक्ति, मोटार, रेडिओ, विमानें यांसारखे नवीन नवीन शोध लागतात आणि त्यामुळें राहणीमान आणि संस्कृति यांची प्रगति होत जाते. उत्पादन-वस्तूंवरील आणि उपभोग्यवस्तूंवरील भांडवली विनियोगाच्या विस्ताराचा इंग्लंडमधील निर्देशांक, इंग्लंडचा परराष्ट्रीय व्यापार लक्षांत घेऊनहि, जवळ जवळ दुपटीनें वाढला असें दिसून येतें.

## भांडवली विनियोग आणि रोजगारी

भांडवली विनियोग आणि रोजगारी यांमधील प्रमाणावरच योजनेमध्यें कोणत्या दर्जाचें तंत्र वापरायचें तें ठरलें जातें. भांडवल आणि मनुष्यबळ यांजमध्यें रोजगारीसाठीं जर मुक्तस्पर्धा चालूं असेल; तंत्रातंत्रामध्यें जर तशी आत्यंतिक भिन्नता नसेल; कर्तृत्व आणि शोधकता हीं योग्य त्या प्रमाणांत मिळून, एकाच उद्योगधंद्यांतील निरनिराळ्या तांत्रिक प्रक्रियांत, भांडवल आणि मनुष्यबळ याजमध्यें तांत्रिक गरज आणि घटकखर्च यांच्या अनुरोधानें आनुषंगिक सुसंगति जर प्रस्थापित करतां येत असेल तर वरील विधानाला कोणतीहि हरकत उपस्थित करतां येणार नाहीं. आपल्या देशामध्यें मात्र या गोष्टी जुळून येणें शक्य नाहीं. जी मंडळी सुधारलेल्या तंत्राचा पुरस्कार करतात त्यांना ही निवड केवळ जुनाट आणि अद्ययावत् तंत्रातीलच निवड आहे असें वाटतें. या उलट जुन्या अथवा परंपरागत तंत्राचा उदोउदो करणारे एका महत्त्वाच्या वस्तुस्थितीकडे डोळेझांक करतात. प्रगति ही वाढत्या संचयांतून होत असते आणि वाढतां संचय वाढत्या कार्यक्षमतेंतूनच म्हणजे सुधारलेल्या तंत्रापासून होत असतो ही गोष्ट ते कबूल करीत नाहींत.

## विनियोग आणि परराष्ट्रीय हुंडणावळ

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेकरतां लागणारी परराष्ट्रीय हुंडणावळ म्हणजेच करावी लागणारी आयात, आणि राष्ट्रीय उत्पन्नांत होणारी वाढ या संबंधीं बरीच चर्चा आणि त्याबरोबर चिंताहि ठिकठिकाणीं व्यक्त झालेली आहे. चलनवाढीच्या स्वरूपांत होणाऱ्या भांडवली खर्चामुळें परराष्ट्रीय व्यवहारांतील समतोलपणा ढासळतो ही गोष्ट थोडावेळ नजरेआड करूं. पण तरीहि राष्ट्रीय उत्पन्नांत पडणारी भर योग्य तेवढी निर्यात वाढवून विकासशील अर्थव्यवस्थेला लागणाऱ्या वाढत्या हुंडणावळीची गरज भागवूं शकेल किंवा नाहीं हा मोठाच प्रश्न आहे. या प्रश्नाला उत्तर देतांना आपल्याला तीन गोष्टींचा विचार करायला हवा.

(१) योजनेंतील ४८०० कोटी रुपयांच्या विनियोगांतून उद्योगधंदे, बांधकाम वगैरे योजनांना लागणारी परकीय हुंडणावळ अजमावणें फारसें कठीण नाहीं. सर्व साधारणपणें २५ टक्के परकीय हुंडणावळ लागेल असें म्हटल्यास तें फारसें चूक ठरणार नाहीं.

(२) दरवर्षी सुरुवातीच्या विनियोगांतून उत्पन्न वाढत जाईल आणि योजनेंतील विनियोगाकरितां लागणारा संचय वगळल्यास उरणारें उत्पन्न, उपभोग्य उत्पन्न म्हणून म्हणतां येईल. उपभोग्य उत्पन्नाचे आयातीवरती संपणारें प्रमाण उपभोग्य उत्पन्नाच्या वाढीबरोबर कमी होईल, वाढेल कीं होतें तसेंच राहील, हा एक प्रश्न आहे. आयातीवरील निर्बंधामुळें वाचणाऱ्या क्रयशक्तीमुळें एतद्देशीय वस्तूंची मागणी वाढली तर त्यामुळें उत्पादनसाधनें, निर्यातीच्या उद्योगधंद्यांतून बाहेर पडतात. त्यामुळें आयात वस्तूंची मागणीहि आपोआप कमी होते. तेव्हां यांतून व्यापारमूल्यांतील तफावतीला निश्चित फायदा काय होतो तें तपासलें पाहिजे. वरील प्रमाण कायम राहतें असें जर मानलें तर करावी लागणारी अधिक आयात आणि त्याकरितां लागणारी वाढती निर्यात ही अंदाजें दरवर्षाला सरासरीं ६० कोटी रुपयांची होईल असें वाटतें.












(३) यानंतर वरील उद्दिष्ट साध्य करण्याकरितां आपण जे प्रयत्न करणार आहोंत त्यामुळें आपल्या परदेशांतील बाजारपेठांवर कांही ताण पडतो किंवा कसें हें पाहायला हवें, याचाच अर्थ, एवढी निर्यात करतां येणें आपणाला शक्य आहे कां याचा विचार करणें.

हे तीन घटक तपासून घेतल्यानंतर आपली परकीय हुंडणावळ आणि आपल्या गरजा यांचा तुलनात्मक विचार करतां येणें शक्य होईल. आणखी एक गोष्ट विचारांत घेतली पाहिजे, ती ही कीं पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत झालेल्या सर्वच विनियोगाचे दृश्य फायदे अजूनपर्यंत मिळूं लागलेले नाहींत, ते कदाचित् दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत मिळूं लागतील. तोच अनुभव दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या संदर्भांतहि येईल. आपलें मुख्य तत्त्व राष्ट्रीय उत्पन्न आणि राष्ट्रीय खर्च यांमध्यें स्वयंशासित समतोलपणा प्रस्थापित करणें म्हणजेच आयातीवरील खर्चाइतका राष्ट्रीय उत्पादनाचा भाग निर्यातीकरितां मोकळा करीत जाणें, हें राहायला हवें.

## उत्पादन आणि चलन

अंशत: नियोजनबद्ध असणाऱ्या आपल्यासारख्या अर्थव्यवस्थेमध्यें पैसापुरवठ्याच्या धोरणामागील उद्दिष्ट नियोजित विनियोग निष्फळ करूं पाहणाऱ्या शक्तींचा पाडाव आणि आनुषंगिक उपाययोजना हेंच असायला हवें. या विरोधी प्रवाहांचें विश्लेषण कांहीसें असें करतां येईल. आपल्या अर्थव्यवस्थेचें एक महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य असें आहे कीं, आपल्याकडील लोकांमध्यें दोन निश्चित आणि ठळक असे वर्ग पाडतां येतील. कांही लोक पैसा आणि बचत सांठवून ठेवतात तर दुसरे आपली बचत गुंतवूं इच्छित असतात. या वर्गवारीप्रमाणें कसणारे जमिनमालक, खेडूत वगैरे सर्वसाधारणपणें पहिल्या वर्गात आणि व्यापारी, पगारदार मध्यमवर्गीय अथवा शहरवासीय दुसऱ्या वर्गांत मोडतात. हें वर्गीकरण जर बरोबर असेल तर पैशाचा अतिरिक्त पुरवठा करण्याचें धोरण आणि तज्जन्य चलनवाढ महागाईमुळें अंमलांत आणणें केवळ अशक्य आहे. दुसरें असें कीं योजनेकरितां लागणारी परकीय हुंडणावळ देणगीच्या स्वरूपांत न घेतां परिश्रमपूर्वक मिळवावयाची असेल तर हुंडणावळीचा दर बळकट आणि वाढता राहावयाला हवा. परिणामी निर्यातीवरील भार कमी होईल आणि आयात माल त्या प्रमाणांत स्वस्त होईल. यामुळें पैशाची किंमत घटण्याचीहि भीति राहणार नाहीं. योजनेच्या निरनिराळ्या काळामध्यें लोकांची पैशाची मागणी बदलत जाईल. या मागणीचा वेळोवेळीं अचूक अंदाज बांधणें हें अत्यंत महत्त्वाचें पण तितकेंच दुरापास्त काम आहे. ही पैशाची मागणी करयोजनेवर–विशेषत: मृत्युकर, मालमत्तेवरील कर वगैरेवर–अवलंबून राहते. अर्थव्यवस्थेमध्यें बरेंचसें चलन जिरूं लागलें अथवा सांठवलें जाऊं लागलें तर चलन वाढवून पैशाचा पुरवठा करावा लागेल. आणखी एक महत्त्वाचा मुद्दा येथें विशद केला पाहिजे आणि तो म्हणजे देवघेवींत होणाऱ्या पैशाच्या वापराचें प्रमाण. पैशाचा वापर बऱ्हंशी उत्पादनाच्या वैशिष्ट्यावर आणि वाढाऱ्यावरती अवलंबून असतो आणि म्हणून योजनेंतील राष्ट्रीय उत्पन्नांत होणाऱ्या २५ टक्के वाढीमुळ पैशाची व्याप्तीहि तितक्याच प्रमाणांत वाढेल असें वाटतें.

## राष्ट्रीय आणि खाजगी उद्योगधंद्यांचें क्षेत्र

पूर्णतया नियोजनबद्ध असलेली अर्थव्यवस्था आणि मुक्त साहस आणि स्पर्धा यांवर आधारलेली अर्थव्यवस्था या दोहोंतूनच निवड करायची असेल तर आतांपर्यंत चर्चिलेल्या मुद्द्यांच्या अनुषंगानें आम्हीं नियोजनाचीं मुख्य तत्त्वें विशद केल्यासारखींच आहेत. पण ही निवड नेहमीं अशी परस्परविरुद्ध तत्त्वप्रणालींतलीच असेल असें नाहीं. आपल्याकडेच पाहा ना.










तडजोडींतहि एक प्रकारचें नावीन्य आणि आकर्षकपणा असतो. ज्या क्षेत्रामध्यें खाजगी साहस इष्ट नसेल किंवा निरुपयोगी ठरेल त्या क्षेत्रांत सामाजिक 'प्राधान्यते'ला (Priority) स्थान मिळतें. आणि अवशिष्ट क्षेत्रामध्यें संघर्ष आणि वितुष्ट टाळण्यापुरतीं नियंत्रणें किंवा बंधनें घालून इतरांना मोकळीक दिलेली असते. सरकारी आणि खाजगी उद्योगधंद्यांचें क्षेत्र आणि विस्तार आणि त्याजबरोबर भांडवली विनियोगाचें प्रमाण यांसंबंधी बरीच साधक बाधक चर्चा झालेली आहे. क्षेत्र-विस्तार आणि कार्य यांचा विचार करतांना आपल्याला अनेक मुद्द्यांचा विचार करायला हवा. एकंदर पार्श्वभूमि आणि इतिहास, भांडवलाची आणि साहसाची उपलब्धता, नैसर्गिक मक्तेदारीला अनुकूलता, उद्योगधंद्यांतील परस्पर पूरकता आणि अंतिम आर्थिक उद्दिष्टें इत्यादि गोष्टींचा विभक्तपणें आणि त्याचबरोबर साकल्यानें विचार झाला पाहिजे. नियोजनाच्या यशाच्या दृष्टीनें या दोन्ही क्षेत्रांतील आर्थिक हालचालींसंबंधीं एखादें आदर्श धोरण घालून देणें योग्य ठरणार नाहीं. पण असें आदर्श धोरण जरी घालतां आलें नाहीं तरी दुरवस्थेमुळें आणि चुकीच्या अंदाजामुळें नियोजनाच्या मार्गांत गंभीर अडचणी निर्माण झाल्यावांचून राहणार नाहींत.

पहिल्या पंचवार्षिक योजनेनुसार दोन्ही क्षेत्रांत मिळून सुमारें ३१०० कोटी रुपयांचा भांडवली विनियोग झाला असावा असा अंदाज आहे. विकास-योजनांवरील महसुली खर्च जमेस धरतां सरकारी क्षेत्रांतील विनियोग सुमारें २००० कोटी रुपये होतो. म्हणजे त्याचें प्रमाण २:१ हें पडतें. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेप्रमाणें एकूण भांडवली विनियोग ६२०० कोटी रुपयांचा होणार आहे आणि सरकारी आणि खाजगी क्षेत्राचा वांटा अनुक्रमें ३८०० कोटी रुपये आणि २४०० कोटी रुपये असा आहे. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंतील प्रमाण सरकारी क्षेत्राकडे जरा जास्त झुकलें आहे.

या दोन क्षेत्रांतील समतोलपणा नाहींसा होईल किंवा कसें याचें उत्तर भविष्य काळावरतींच सोपविणें योग्य होईल. सरकारी क्षेत्रांतून निर्माण होणारी वस्तूंची मागणी खाजगी उद्योगधंद्यांत २४०० कोटी रुपयांचा विनियोग करून वस्तूंची जी पैदास होणार आहे त्याहून अधिक राहील का ? कां याच्या अगदीं विरुद्ध घडेल ? कदाचित् असेंहि होईल कीं दोन्हीं क्षेत्रांत होणाऱ्या विनियोगामुळें उत्पन्नांत जी भर पडणार आहे ती सर्वांच्या सर्व उपभोग्य वस्तूंवर केंद्रित होईल आणि मग मूलभूत आणि भांडवली किंवा अवजड उद्योगधंद्यांवर योजनेंत जो सर्वस्वीं भर देण्यांत आलेला आहे तो दृष्टिकोणच मूलतः बदलावा लागेल.

पण यामधील परस्पर संबंध कसे बदलतात या विषयीं कांहीं विचार मांडतां येतील. या संबंधांत सर्वांत महत्त्वाचा भाग सरकारी विनियोगाचा असतो. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत सरकारी विनियोगाचें प्रमाण इतकें मोठें आहे कीं त्यामुळें खाजगी क्षेत्रांत निर्माण होणारा कच्चा माल व इतर वस्तू यांची मागणी कितीतरी पटीनें वाढणार आहे. सरकारी विनियोगामुळें उत्पादनाचीं नवीन नवीन क्षेत्रें उपलब्ध होत जातात आणि जुन्यांचा विस्तार होत जातो. आणि हें घडतें तें सरकारी क्षेत्राबाहेर. या गोष्टीची फारशी जाणीव अजून आम्हाला नाहीं. या दोन विभागांना जें कार्य-क्षेत्र वांटून देण्यांत येतें त्यावरहि खाजगी क्षेत्रांत गुंतविलें जाणारें भांडवल अवलंबून असतें. सर्वसाधारणपणें असें म्हणतां येईल कीं, दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंतील सरकारी विनियोग प्रामुख्यानें मूलभूत उद्योगधंदे अथवा तत्सम स्थिर भांडवलाच्या योजना यांजवर केंद्रित केला गेला आहे. उरलेलें कमी भांडवल लागणाऱ्या, म्हणजेच विनियोग उत्पादनाचें प्रमाण जास्त असणाऱ्या उद्योग-

धंद्याचें क्षेत्र, किंवा उपभोग्य वस्तू निर्माण करणाऱ्या छोटेखानी उद्योगधंद्यांचें क्षेत्र हें खाजगी साहसाला देऊं केलें आहे. परिणामीं खाजगी भांडवलदारांच्या बाबतींत विनियोग आणि उत्पादन यांचें प्रमाण कमी न राहतां सतत वाढतें राहणार आहे.

याशिवाय खाजगी क्षेत्रांतील बराचसा विनियोग वाढत्या उत्पन्नांमुळें निर्माण होणाऱ्या वाढत्या मागणीच्या प्रेरणेनेंच होण्याची शक्यता आहे. हा विनियोग प्रामुख्यानें घरबांधणी आणि उपभोग्यवस्तू यांवर म्हणजे सरकारी क्षेत्राबाहेर असणाऱ्या उद्योगधंद्यांवर होणार आहे. खाजगी क्षेत्रांत शेती, व्यापार, दळणवळण वगैरे अंतर्भूत केल्यानें योजनेच्या या अंगाचा ऊहापोह आंकडेवारीच्या आधारें करणें सुरक्षित नाहीं.

## नियोजन आणि आर्थिक विकास

अर्धविकसित अर्थव्यवस्थेंत होणारा आर्थिक विकास दोन गोष्टींवर अवलंबून असतो. एकतर देशामध्यें विस्तृत प्रमाणावर अद्ययावत् तंत्रांचा वापर करणें शक्य असतें आणि दुसरें असें कीं देशांतील बेकारीमुळें रोजगारी आणि विकास यांमध्यें एक प्रकारचा विरोध निर्माण होतो. मध्यवर्ती नियोजनसमितीला शक्यतितकी बेकारी ताबडतोब दूर करण्याची निकड लागलेली असते, तर अर्थशास्त्र आर्थिक विकासालाच प्राधान्य आणि महत्त्व देतें. जुनीं आणि नवीं दोनीहि तंत्रें बाजूला ठेवून मधल्या तंत्रांचा वापर करणें किंवा त्याच उद्योगधंद्यांत भांडवल आणि मनुष्यबळ यांचा भिन्न प्रमाणांत वापर करणारीं तंत्रें निवडून ही समस्या कांहीं अंशीं सोडविणें शक्य आहे. परंतु हें करण्याकरितां नियोजन अधिकाऱ्यांना बरेचसे अधिकार द्यावे लागतील आणि त्यांना देशाच्या एकूण औद्योगिक रचनेमध्यें येवढी पुनर्रचना आणि ढवळाढवळ करावी लागेल कीं हें धोरण प्रत्यक्ष अंमलांत आणणें म्हणजे कांही लहानसहान गोष्ट नव्हे.

मोठ्या प्रमाणावर परकीय मदत मिळणें किंवा सामाजिक उपभोगामध्यें बरीच कपात करणें या दोन्ही गोष्टी अशक्य म्हटल्या म्हणजे हाताशीं असलेलीं तंत्रें किंवा नवीन तंत्रें वापरण्याकरितां लागणारा भांडवलाचा वाढावा, उपभोग्यवस्तू निर्माण करणाऱ्या उद्योगधंद्यांतून अथवा उत्पादक वस्तू निर्माण करणाऱ्या उद्योगधंद्यांतून सुधारलेल्या तंत्राचा मोठ्या प्रमाणावर आणि तोहि तांतडीनें वापर करूनच निर्माण करावा लागेल. मात्र जुनीं तंत्रें वापरणाऱ्या औद्योगिक क्षेत्राच्या बाबतींत सुधारणेची निकड द्रव्यसाहाय्य अथवा करआकारणीमध्यें सापत्नभाव करून बोथट करतां कामा नये. अर्धविकसित अर्थव्यवस्थेमध्यें खरा प्रश्न उपभोग्यवस्तू विरुद्ध उत्पादक-वस्तू हा नाहीं तर जुनीं किंवा परंपरागत तंत्रें विरुद्ध सुधारलेलीं अद्ययावत् तंत्रें हा आहे. विकासापेक्षां रोजगारीला जी मंडळी प्राधान्य देतात त्यांची शेवटी दोहोंच्याहि बाबतींत निराशा होण्याची शक्यता अधिक आहे.

तंत्राचा वापर, भांडवलाचा संचय आणि प्रत्यक्षांत वाढणारा व्यवसाय यांमध्यें कल्पिलेलें कालाचें अंतर अतिशयोक्तच ठरण्याचा संभव आहे. नियोजन अधिकारी अगदीं लष्करी शिस्तीनुसार वेळापत्रकाप्रमाणें नियोजन अंमलांत आणूं शकत नाहींत हें एकप्रकारें आपलें सुदैवच होय. यामुळें व्यक्तिगत कर्तृत्व, साहस आणि ईर्ष्या यांना मुबलक वाव मिळतो. श्रद्धा आणि विश्वासाच्या जोरावर पर्वतप्राय गोष्टी साध्य होऊं शकतात. राजकीय पुढारी आणि अर्थशास्त्रज्ञ यांना ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.[1]

१ कटक येथील अ. भा. अर्थशास्त्र परिषदे-( ता. २६-२९ डिसेंबर, १९५६ ) च्या अध्यक्षीय भाषणांतील उतारे.







प्रा. डॉ. एच्. डी. सांकळिया

# गुजरात, महाराष्ट्र आणि कर्नाटक यांमधील संबंध आणि पट्टी-हट्टी

## लाट प्रदेशाच्या मर्यादा

'नवभारता'च्या ऑक्टोबर-नोव्हेंबरच्या अंकांत श्री. शं. बा. जोशी यांनीं "व्यक्ति-नामांतून ध्वनित होणारा लाट-मऱ्हाट-कर्णाटांतील प्राक्कालीन संबंध" या शीर्षकाखालीं एक लेख लिहिला आहे. त्यांत त्यांनीं माझ्या "खि. पू. ३०० ते इ. स. १३०० पर्यंतच्या गुजरातचा ऐतिहासिक व सांस्कृतिक भूगोल आणि त्यांतील मानववंशविवरण याविषयींचें अध्ययन" ( Studies in the Historical and Cultural Geography and Ethnography of Gujarat, B. C. 300-1300 A. D. ) या प्रबंधाचा उपयोग केला असून त्यावरून वाटेल तसलीं, थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे भरमसाट स्वरूपाचीं, अनुमानें काढण्याचा प्रयत्न केला आहे. गुजरात, महाराष्ट्र आणि कर्नाटक यांचे भूतकाळांत भौगोलिक, सांस्कृतिक व राजकीय संबंध होते यांत कांहींच शंका नाहीं. तथापि त्यामुळें लोकव्यवहारांतील शब्दांच्या रचनेवर आधारलेले हवे ते काल्पनिक कयास बांधण्याची मुभा कांहीं आपणास मिळूं शकत नाहीं. पहिली गोष्ट म्हणजे आजचा गुजरात हा आनर्त, लाट आणि सौराष्ट्र अशा तीन मुख्य भागांत विभागला गेला होता. आनर्त हें उत्तर गुजरातचें नांव होय. आजच्या खेडा जिल्ह्याच्या उत्तरेकडील हा भाग होय; आणि राजपुतान्यांतील कांहीं प्रदेशाचाहि त्यांत समावेश होत होता. उत्तरेकडे खेडा किंवा भडोच आणि दक्षिणेकडे दमण यांमधील दक्षिण गुजरातच्या प्रदेशास लाट असें संबोधण्यांत येई. श्री. जोशी यांना हा फरक समजल्याचें मुळीं दिसतच नाहीं. यामुळेंच त्यांनीं किरातकूपच्या लोकांचीं उदाहरणें दिलीं आहेत. हा भाग दक्षिण राजपुतान्यांत होता आणि त्या प्रदेशाला लाट असें कधींहि म्हणण्यांत आलेलें नाहीं.

## नांवावरून काढलेलीं अनुमानें

दुसरें म्हणजे निरनिराळ्या नांवावरून काढलेलीं अनुमानें. गुजरातमधील आल्हण, कर्नाटकांतील अल्लम प्रभू आणि महाराष्ट्रांतील अल्ल शर्मा या शब्दांत कदाचित कांहीं साम्य असलें तरी अल्लद्वारां त्या नांवामध्यें खरोखरी कसलाहि संबंध प्रस्थापित होत नाहीं. त्याचप्रमाणें जस > यश यांचा संबंध असला तरी त्याचा याल, यल्ल किंवा कर्नाटकांतील देवता यल्लम्मा यांच्याशीं कांहींहि संबंध नाहीं. ( गुजरातसंबंधीच्या माझ्या अध्ययनाप्रमाणेंच ) माझ्या एक विद्यार्थिनी श्री. सुमति मुळे यांनीं इ. स. ४०० ते १३०० या काळांतील दख्खन व कर्नाटकमधील आलेखांचा अभ्यास केला आहे. पश्चिम चालुक्य, राष्ट्रकूट, कल्याणी चालुक्य कलचुरी, अनुक्रमें कोंकण, उत्तर व दक्षिण महाराष्ट्र यांतील तीन शिलाहार घराणीं, आणि यादव यांपासून त्यांनीं गोळा केलेल्या सुमारें २००० नामांच्या यादींत गुजरातमधील नामांशीं तुलना करतां येईल अशीं फक्त सहा नामें आढळतात. एक म्हणजे साहिल, शक ७८३ ( राष्ट्रकूट ), नंतर जाल्हन कल्याणी चालुक्य आणि जल्लन किंवा जाल्हण ( यादव ) आणि बिल्हण शेठी, यांना कोल्हापुरचे शिलाहार म्हणून म्हटलें जातें, या नामांची उत्तर गुजरातमधील आल्हणसारख्या नामांशीं तुलना करणें शक्य आहे. तथापि अल्लशर्म, भाइल्लस्वामी, अल्लपई अशा इतर नामांचा त्यांच्याशीं कांहींहि संबंध नाहीं. या ठिकाणीं मला असेंहि म्हणावेसें वाटतें कीं मुळांत कन्नड असलेलीं चालुक्य नामें गुजरात व सौराष्ट्रमधील राजघराण्यांत आढळणें आश्चर्यजनक नाहीं. कारण, गुजरात, महाराष्ट्र व कर्नाटकांतील कांहीं मुलुख हा निदान दोनतीनशें वर्षेंपर्यंत तरी चालुक्यांच्या वर्चस्वाखालीं होता; आणि त्यामुळें साहजिकच गुजरातमध्यें कन्नडचा थोडाबहुत परिणाम








दिसून येतो. वस्तुत: कर्णराजाची मयनल्लदेवी नांवाची एक राणी कर्नाटकमधीलच होती; आणि सुप्रसिद्ध जयसिंह सिद्धराज याची ती माता होय. श्री. जोशी यांनीं माझ्या पुस्तकांतील एक वाक्य (पृ. ७२ नवभारत, वर्ष १०, अंक १-२) उद्‌धृत केलें आहे. " राष्ट्रकूटांनीं ब्राह्मणांना दिलेल्या आश्रयाचें हें विश्लेषण पाहिलें म्हणजे दख्खन व कर्नाटकमधील ब्राह्मणांविषयीं त्यांनीं विशेष पक्षपात दाखवला नाहीं असा ग्रह होतो पृ. ( १२८ ). आणि अशा अर्थाचा इंग्रजी उतारा दिल्यानंतर ते म्हणतात: " म्हणून लाट-मऱ्हाटांतील कानडी स्वरूपाचा भाग हा कर्नाट-प्रभाव-दर्शक नव्हे. तो प्राचीन काळीं त्या प्रांतीं असलेल्या कुंतल संस्कृतीचाच अवशिष्ट भाग आहे असें म्हणणेंच ऐतिहासिक घटनांस धरून होणार नाहीं काय ? " मला या विधानाचा अर्थच खरोखर कळत नाहीं. या अध्ययनांतील माझा हेतु शुद्ध वस्तुनिष्ठतेचा होता; आणि व्यक्तींच्या व स्थानांच्या नामांच्या अगदीं काटेकोरपणें केलेल्या वर्गीकरणावरच तें अध्ययन आधारलें आहे.

### ऐतिहासिक भूगोलास पाया हवा

पट्टी-हट्टी या शब्दांवरून मरहट्टी हा शब्द काढण्याच्या श्री. जोशी यांच्या कल्पनाविलासाविषयीं " कन्नड रिसर्च इंस्टिटयूट " च्या वतीनें १९५४ सालीं मी दिलेल्या व्याख्यानांतील माझें म्हणणेंच येथें उद्‌धृत करावेसें वाटतें:

" यावरून स्थळ-नामांचा विचार करण्याकडे मी वळतो. पांचव्या शतकापासून तों नवव्या-दहाव्या शतकापर्यंतच्या काळांत गुजरात व दख्खनमध्यें स्थळ-नामांना संस्कृत रूप देण्यांत येत होतें आणि त्यानंतरच्या काळांत स्थानिक वा देशी शक्तींचा प्रभाव पडण्यास सुरुवात झाली असें समजण्यांत येतें. बहुसंख्य आलेख हे प्राकृतांत असल्याकारणानें त्यांत स्वाभाविकपणें स्थळ-नामांचीं प्राकृत रूपेंच वापरलीं आहेत.

तथापि कर्नाटकमध्यें मात्र ही प्रवृत्ति सहाव्या शतकापासूनच दिसून येते. आणि अनेक स्थळनामें पूर्णतया किंवा अंशत:, जुन्या कन्नडमध्येंच असलेलीं आपणांस आढळतात.

तीं स्थळनामें एखाद्या नकाशावर आलेखित केल्यास प्राचीन कर्नाटकांतील प्रादेशिक घटकांचा आकार व घडण याबद्दल थोडीबहुत कल्पना आपणांस येऊं शकते. त्याचप्रमाणें कांहीं स्थळ-नामें व व त्यांना जोडलेले प्रत्यय यांचें प्राचीनत्वहि समजूं शकतें. अशा प्रकारें निघणाऱ्या अनुमानांची लगतच्या गुजरात व दख्खनच्या प्रदेशांसंबंधींच्या अनुमानांशीं तुलना करणें शक्य आहे ( या प्रदेशांतच अजून अशा प्रकारचा अभ्यास झाला आहे ). गुजरात, महाराष्ट्र व कर्नाटक येथें कांहीं स्थान-नामांना जोडण्यांत येणाऱ्या प्रत्ययांचा कमी अधिक प्राचीनत्वासंबंधीं आणि त्यांच्या उगमस्थानासंबंधीं अशाप्रकारेंच तात्पुरत्या स्वरूपाचीं अनुमानें काढतां येतील. खरी आवश्यकता असेल तर ती प्रथम ऐतिहासिक भूगोलाचा भक्कम पाया तयार करण्याचीच होय.

### श्री. जोशी यांचें म्हणणें

धारवाडचे श्री. शं. बा. जोशी यांनीं आपल्या दूरगामी काल्पनिक विचारांना आधारभूत म्हणून घेतलेले विशिष्ट प्रत्यय डोळयापुढें ठेवून त्यांच्या अनुषंगानेंच आमच्या अध्ययनावरून निघणारे काहीं निष्कर्ष मी थोडक्यांत मांडणार आहे.[1] श्री. जोशी यांचें मत पुढीलप्रमाणें मांडतां येईल : (१) पट्टी-पाडी हे शब्द पाडु या मूळ रूपांतून निघाले

1. Joshi S. B., " Etymology of Place-Names Paṭṭi–Haṭṭi, ABORI, XXXIII ( 1952 ), pp. 41-56; cf. also Hiremath, R. C., Linguistic Investigations of some Place-Names in Karnatak " *Journal of Indian History*, Vol. XXXI. ( 1953 ), p. 84.










आहेत. आणि त्याशिवाय ( २ ) म्हणजे (अ) पट्टी, पाडी, पाडा, (ब) वाडी, वाडा, (क) हट्टी, हाट, हाड, हाडी हे भिन्न भिन्न शब्द नसून उच्चारभेदामुळें बनलेलीं हीं सर्व एकाच शब्दाचीं भिन्न रूपें होत. (३) पट्टी (हट्टी) आणि पाडा हे शब्द गुराख्याच्या जीवनापासून शेतीकडे झालेलें संक्रमण सूचित करतात; ( ४ ) यजुर्वेदांतील पत्ती हे पट्टीच होत व ते अनार्य आहेत; ( ५ ) ज्याअर्थी कानडीमध्यें 'प' चा 'ह' होतो त्याअर्थी त्यांच्या मतानें तेथील भाषेंत 'महाराष्ट्र' हें "मरहट्ट" झालें असावें; आणि ( ६ ) नाशिकपासून श्रीशैलपर्यंतचा हाटक देश म्हणून ओळखला जाणारा प्रदेशच हा 'मरहट्ट' प्रदेश असावा; ( ७ ) हाटक देश हें नांव प्राप्त होण्याचें कारण ही सुवर्णभूमी होती. संस्कृतमध्यें हाटक म्हणजे सोनें असा अर्थ आहे.

या खरोखरच आश्चर्यजनक कल्पना आहेत. आणि त्या अंशतः कां होईना पण बरोबर आहेत असें सिद्ध करण्याजोगा निश्चित पुरावा मिळाल्यास ती अत्यंत कुतूहलजनक बाब ठरेल. या बाबतींत अगदीं साधी गोष्ट म्हणजे कन्नड, मराठी व उत्तर भारतीय साहित्य आणि शिलालेख यांच्यांतील पट्टी-हट्टी, पाडा-वाडा, पद्रपल्ली या शब्दांचें प्राचीनत्व दर्शविणें ही होय. हें केल्यानंतर पुढें हे शब्द मुळांत संस्कृत वा संस्कृतेतर आहेत याचा विचार करतां येईल. आणि नंतर संस्कृत वा संस्कृतेतर मूळरूपांचा एकमेकांच्या क्षेत्रांत केव्हां, कसा व कां प्रभाव पडला हें दाखवावें लागेल.

### शब्दांचें प्राचीनत्व

ज्याअर्थी श्री. जोशी यांनीं यांतील कांहींहि केलेलें नाहीं त्याअर्थी त्यांच्या कोणत्याहि अनुमानांचा स्वीकार करतां येत नाहीं. कारण 'पद्र' हा शब्द सौराष्ट्रांतील एका स्थळ-नामांत आपणांस इ. स. च्या दुसऱ्या शतकांत आढळतो. आणि तेव्हांपासून १००० वर्षांहून अधिक काळपर्यंत त्याचा सतत उपयोग होत गेलेला दिसून येतो.

या 'पद्र'चेंच पुढें वद्र असें रूप झालें. आणि 'वद्र' वरून नियमानुसार काढतां येण्याजोगीं अनेक नामें सौराष्ट्रांत इ. स. च्या ६ व्या शतकापासून आढळतात. आतां 'पद्र' हा प्रत्यय, श्रीमती मुळे यांच्या म्हणण्याप्रमाणें वर्ध्याच्या राष्ट्रकूट शिलालेखांत केवळ एकदांच आढळतो; तथापि महाराष्ट्र व उत्तर कर्नाटक येथें इतरत्र तें कधींहि आढळत नाहीं. यामुळें 'पद्र' हा प्रत्यय केवळ सौराष्ट्र व गुजरातपुरताच मर्यादित होता, या माझ्या मताला पुष्टी मिळते. तीच गोष्ट 'पल्ली'ची आहे. दक्षिण गुजरातमध्यें इ. स. च्या ५ शतकांतील ताम्रपटांत तें आढळतें. आणि तेव्हांपासून मध्ययुगीन काळांतून अगदीं आधुनिक काळपावेतों त्याचा उपयोग होत आला आहे. जैन वाङ्मयांत त्याचा खि. पू. २–३ शतकांपर्यंत तें आढळूं शकतें. परंतु महाराष्ट्र व कर्नाटकमध्यें मात्र 'पल्ली' हें रूप इ. स. ६ व्या शतकांतच दिसून येतें. आणि इ. स. ९ व्या शतकाच्या सुमारास कर्नाटकमध्यें त्याचें 'हल्ली' असें रूप बनतें. हीच गोष्ट 'पाडा' आणि 'वाडा' या शब्दांच्या बाबतींतहि सांगतां येईल. गुजरातमध्यें इ. स. च्या ६ व्या शतकांत आढळणाऱ्या 'पाटक' आणि वाटक' या शब्दांवरून हीं रूपें निघालीं आहेत असें खात्रीशीरपणें म्हणतां येतें. त्यापुढें एक शतकानंतर 'वाटक' हा शब्द रत्नागिरीच्या बदामी चालुक्यांच्या आलेखांत दिसतो. परंतु त्यानंतर दख्खन किंवा कर्नाटकमध्यें तो क्वचितच आढळून येतो. 'पाटक' यालाहि हें म्हणणें लागू पडण्यासारखें आहे.

तथापि 'पट्टी' या प्रत्ययासंबंधीं असें म्हणतां येत नाहीं. तें प्रथम प्रारंभीच्या कदंबांच्या मळवल्ली स्तंभ लेखांत आढळतें. आणि नंतर कर्नाटकांतील ताम्रपट आणि शिलालेखांत आढळून येतें. तथापि महाराष्ट्र व गुजरातमध्यें तें एकदांहि दिसून येत नाहीं. दहाव्या शतकाच्या आरंभीच्या सुमारास 'प' च्या ऐवजीं 'ह' येऊन 'हट्टी' हें रूप दिसूं लागतें.



अनुक्रमणिका








'पेठ' पेड हा प्रत्यय प्रथम मध्यप्रांतांतील वाका-टकांच्या ताम्रपटांत ( ४ थें शतक ) आढळतो आणि ' आहार ' खि. पू. ३ ऱ्या शतकाइतक्या प्राचीन काळीं आढळतो. नंतरच्या काळांत उत्तर-प्रदेश, बंगाल, गुजरात, सौराष्ट्र आणि दख्खन इत्यादि उत्तर हिंदुस्थानांतील आलेखांत ते आढळून येतात.

शब्दप्रसारनिदर्शक नकाशे

आतां एखाद्या स्थळनामाच्या किंवा प्रत्ययाच्या प्राचीनत्वाच्या किंवा ते प्रथम केव्हां आढळतात हें निश्चित करणें हें पुरेसें नाहीं. गुजरात आणि उत्तर कर्नाटक मिळून होणारा दख्खन या प्रदेशांत करतां येतें त्याप्रमाणें तीं नांवें नकाशावर आलेखित करण्या-चें कार्य केलें पाहिजे. असें केल्यानें स्थळ-नामें आणि त्यांचे प्रत्यय यांच्या निश्चित रचना दिसूं लागतात. अशा तऱ्हेचे या शब्दांचा प्रसार दर्शविणारे नकाशे पाहिले म्हणजे पाडा, वाडा, पद्र हें प्रत्यय बहुतांशीं गुजरात, सौराष्ट्र आणि त्यांच्या दक्षिण सरहद्दी-वरचा महाराष्ट्रांतील प्रदेश यांतच आढळून येतात. ' पद्र ' हा प्रत्यय कर्नाटक किंवा महाराष्ट्र यांत एकदांहि आढळत नाहीं. उलट, कोंकणपट्टी हा अपवाद वगळल्यास पट्टी-हट्टी हे प्रत्यय कर्नाट-काच्या मर्यादा उल्लंघून गेलेले दिसत नाहींत. कोंकणपट्टी हा शब्द आलेखांत आढळत नाहीं; नंतरच्या काळांत त्याचा वापर झाला आहे.

पट्टी पासून श्री. जोशी हे काढूं पहात असले-ल्या पद्र, पल्ली, पाडा-वाडा, पेठ-हार या प्रत्ययांचा भौगोलिक प्रसार व प्राचीनत्वासंबंधीची वस्तुस्थिति ही अशी आहे. पट्टी या शब्दाला अनेक प्रकारच्या परिणामांचा आधारभूत शब्द म्हणून श्री. जोशी मानतात. गुजरात आणि महाराष्ट्र यांतील प्राचीन स्थळ-नामांत पट्टीला कोठेंहि स्थान नाहीं. कर्नाटकां-तील आलेखांत देखील तो फारसा आढळत नाहीं. आणि शिलालेख आणि ताम्रपटाच्या उपयोगावरून हा व इतर असेच शब्द यांतील ' प ' चा ' ह ' झाल्याचें आपणांस दिसून येतें. असें असल्यानें 'हट्टी' किंवा त्याचेंच मुळरूप ' पट्टी ' हा शब्द मराठी, महाराष्ट्र, हट्ट वा आणखी कांहीं याचा मूळशब्द कसा होऊं शकेल ? वस्तुत: दुसऱ्या पुलकेशीच्या ऐहोल शिलालेखांत ' महाराष्ट्र ' असा स्पष्ट उल्लेख आढळतो. ( इ. स. ६३४ ). आणि त्यावेळीं हट्टी हा प्रत्यय जन्मलेला देखील नव्हता.[२] ' पट्टी ' म्हणजे जमिनीचा तुकडा किंवा पट्टा ( strip ). तो किंवा पट्ट हा शब्द कापडाचा तुकडा वगैरे अर्थाच्या पट् या संस्कृत शब्दाशींच संबंधित अस-ण्याचा अधिक संभव आहे. याबाबतींत पट्टबन्ध या शब्दाशीं तुलना करतां येईल. प्राचीन शिलालेखां-तून आणि ताम्रपटांतून राज्यारोहण प्रसंगीं राजाच्या शिराला वस्त्र गुंडाळण्याच्या विधीला उद्देशून हा शब्द वापरण्यांत आला आहे. तो आणि त्यापासून निघालेले पट्टकिल आणि त्यांची कानडी, मराठी व गुजरातीमधील अनुक्रमें पाटील व पटेल हीं रूपें जमिनीचा वा खेड्याचा एखादा तुकडा ( किंवा पट्टा ) ताब्यांत असणारे शेतकरी किंवा अधि-कारी या अर्थानें वापरले जातात. ' प ' चा ' ह ' होणें हा शुद्ध भाषिक बदल आहे; त्यामागें कस-लीहि आर्थिक कारणपरंपरा नाहीं. त्यामुळें श्री. जोशी यांच्या डोळ्यापुढें दिसत असलेल्या मनोऱ्यासारखे मनोरे रचण्यापूर्वी स्थळ-नामांत आढळणाऱ्या प्रत्ययांचें प्राचीनत्व व भौगोलिक विस्तार हीं निश्चित करून भक्कम पाया तयार केला पाहिजे. " आणि हें कार्य केवळ मुंबई राज्यां-तील तीन भाषिक विभागापुरतेंच नसून सर्व भार-तांतच तें होण्याची गरज आहे.[३]

---

२. आधुनिक स्थळ-नामांमध्यें पट्टी किंवा हट्टी शेवटीं असलेलीं स्थळनामें बेळगांव जिल्ह्यांत १६, धारवाडमध्यें ३७ आणि उ. कारवारमध्यें २८ असल्याचें दिसून येतें.

३. माझीं विधानें डॉ. सुनीतिकुमार चतर्जी आणि डॉ. एस्. एम्. कत्रे यांनीं तपासून पाहिलीं असून त्यांच्या साहाय्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.



अनुक्रमणिका






प्रा. डॉ. ग. मा. कुरूलकर

# रूपकुंड

[ रूपकुंडाजवळ सांपडलेल्या एका गोल तांब्याच्या नाण्यावरून तेथील दुर्दैवी घटनेचा आज-वरच्यापेक्षां अगदीं वेगळा अर्थ लावणें शक्य झालें आहे. कलकत्ता विद्यापीठाचे डॉ. चिन्मय दत्त यांनीं हें नाणें महंमद तघ्लखाच्या राजवटीशीं ( इ. स. १३२५ ते १३५१ ) संबंधित असल्याचें सिद्ध केलें असून महंमद तघ्लखानें आपली एक सेना हिमालयावरून पलीकडे, बहुधा चीनच्या दिशेनें मुलुखगिरीसाठीं पाठ-विली होती असा ऐतिहासिक उल्लेख आहे. ही सेना दिल्लीहून १३३७–३८ सालीं एका नाणावलेल्या सेना-नीच्या नेतृत्वाखालीं निघाली होती; परंतु तिचा हेतु पूर्णपणें फसला. तत्कालीन इतिहासकारांच्या म्हणण्या-प्रमाणें सारें सैन्य बर्फामध्यें गारद झाल्याची शोककथा सांगण्यासाठीं फारच थोडे ( बारनीच्या म्हणण्या-प्रमाणें दहा, इब्न बतुल्लाच्या म्हणण्याप्रमाणें अवघे तीन ) सैनिक परत राजधानीस येऊं शकले असें दिसतें. रूपकुंडांतील अस्थिराशी या दुर्दैवी सेनेंतील शिपायांच्या होत. अशा प्रकारचा निष्कर्ष कलकत्ता विद्यापीठां-तील तज्ज्ञांनीं काढला असल्याची बातमी नुकतीच येऊन गेली. अर्थात उपलब्ध असलेला पुरावा आणि प्रत्यक्ष स्थानावरील अस्थिराशीचें स्वरूप व त्यावरून निष्कर्ष काढतांना लेखकानें निर्माण केलेले प्रश्न या सर्वांचा साकल्यानें विचार केल्यावांचून यासंबंधीं निश्चित कांहींहि सांगणें कठीण आहे. वरील बातमीसाठीं पाहाः टाइम्स ऑफ इंडिया, १८ नोव्हेंबर १९५६ – का. सं. ]

रूपकुंड हें नांव गेले कांहीं दिवस वृत्तपत्रांतून झळकत आहे. या कुंडांत बऱ्याच अस्थि पडलेल्या आढळून आल्यामुळें त्यासंबंधीं साहजिकच कुतूहल निर्माण झालें. ज्यांनीं रूपकुंड पाहिलें होतें, त्यांनीं, रूपकुंडांत निदान ५०० च्या वर अस्थिपंजर असावेत अशा बातम्या आणल्या. १७–१८ हजार फूट उंचीवर पर्वताच्या माथ्यावर असणाऱ्या रूपकुंडांत एकेठिकाणीं अस्थिपंजरांची एवढी मोठी रास असणें ही घटना कुतूहलजनक आहे. यामुळें रूपकुंडाकडे जनतेचें लक्ष वेधलें, व या घटनेसंबंधीं चौकशी करणें आवश्यक झालें. रूपकुंड उत्तरप्रदेशांत आहे, म्हणून त्या प्रदेशाच्या सरकारनें, लखनौ विद्यापीठाला कांहीं मदत देऊं करून या प्रश्नाबाबत चौकशी करण्याचें सुचविलें. विद्यापीठानें हें कार्य, तेथील मानवविज्ञान म्हणजे अँथ्रॉपॉलजी खात्याचे प्रमुख व प्राध्यापक डॉ. बीरेन् मुजुमदार यांच्यावर सोपविलें. हा प्रश्न सोडविण्यास उपयोगी पडणाऱ्या तज्ज्ञांची निवड करण्यांत येऊन, या तज्ज्ञांपैकीं एक म्हणून मला निमंत्रण आलें. चौकशी करण्याची मोहीम रूप-कुंडास जावयाची होती. या मोहिमेवर जाण्याची माझी तयारी आहे, अशी संमति मी दिली.

### अस्थि व अन्य वस्तूंची तपासणी

रूपकुंडांत बऱ्याच मानवी अस्थि आहेत, ही माहिती, दुसरें महायुद्ध चालू असतानांच, टेहेळणी-पथकांतील एका ब्रिटिश सैन्याधिकाऱ्यानें आणली होती. महायुद्धाच्या धुमधडाक्यांत त्याकडे लक्ष जाऊन तपास करणें शक्य नव्हतें. त्यानंतर गेल्या तीन चार वर्षांत उत्तरप्रदेशाच्या वनखात्यांतील एक दोन अधिकारी रूपकुंडास जाऊन आले. त्यांनीं तेथें बऱ्याच अस्थि आहेत याची ग्वाही दिली, व परत येतांना त्यांतील, सोईस्कर रीतीनें आणतां येतील अशीं तीन अस्थिपंजरें, व तेथेंच असलेल्या वस्तू-



अनुक्रमणिका






पैकीं, चप्पलांचा जोड, छत्रीसाठीं उपयोगांत आणलेल्या एक दोन बांबूच्या काठ्या, लाकडी लोट्याचा भंगलेला तुकडा इ० पदार्थ आणले, व हे सर्व पदार्थ व अस्थि शास्त्रीय तपासणी करण्याकरितां मानवविज्ञानाचे प्रा. डॉ. मुजुमदार यांच्या ताब्यांत दिल्या. मानवविज्ञानखात्यानें या सर्व वस्तूंची सूक्ष्म तपासणी करून त्यांचीं मापें घेतलीं. १९५६ च्या मार्च महिन्यांत परीक्षेच्या कामासाठीं मी लखनौस गेलों असतांना त्यावेळीं या सर्व वस्तू मी बारकाईनें तपासल्या. डॉ. मुजुमदार व त्यांचे साहाय्यक डॉ. सेन यांच्याबरोबर या बाबतींत माझी बरीच चर्चा झाली.

या तपासणीचा सारांश स्थूलमानानें पुढीलप्रमाणें होता :

१. अस्थि अर्वाचीन मानवांच्या आहेत. अर्वाचीन मानवाचें अस्तित्व कित्येक हजार वर्षांपूर्वीपासून आजतागायत आहे.

२. एका अस्थिपंजराच्या भुजास्थिवर ( Humerus ) ओलसर मांस, त्वचा व केसहि होते.

३. करोटींत मेंदूकरितां असणारी पोकळी भारतांतील व्यक्तींच्या करोटींतील पोकळीच्या विस्तारापेक्षां बरीच मोठी आहे.

४. तिन्हींपैकीं एका करोटीवर, स्वाभाविक करोटीय उंचवट्यांपैकीं कांहीं फारच उठावदार असल्यामुळें, ही करोटी भारवाहकाचें ( porter ) कार्य करणाऱ्या पुरुषव्यक्तीची असावी.

५. बाकीच्या दोन करोटींतील एक पुरुषाची व एक स्त्रीची असावी.

याशिवाय, १९५५ च्या सप्टेंबर महिन्यांत, वर्तमानपत्रांचे एक वार्ताहर श्री. अय्यर रूपकुंडास स्वत: गेले, व रूपकुंडाचे फोटो घेऊन, ते फोटो व रूपकुंडाची माहिती असलेला एक लेख Illustrated Weekly मध्यें त्यांनीं प्रसिद्ध केला. या फोटोंपैकीं एक फोटो, रूपकुंड, त्यांतील पाणी व कांठ यांचें चित्रण असणारा आहे. त्याच्यांत रूपकुंडाच्या आवारांत मानवी अस्थींचा विखरा स्पष्ट दिसतो.

## रूपकुंडावरील मोहीम

लखनौ विद्यापीठानें पुरस्कारिलेल्या रूपकुंडमोहिमेंत पुढील व्यक्तींचा समावेश झाला होता. प्रा. डॉ. धीरेन मुजुमदार हे या मोहिमेचे नेते होते. मोहिमेच्या काळांत सर्व व्यवस्था पाहण्याचें काम, मानवविज्ञान खात्यांतील साहाय्यक प्राध्यापक डॉ. सेन, व विद्यापीठांतील श्री. जोशी व श्री. कैलास हे दोन विद्यार्थी यांच्यावर सोपविलें होतें. प्रवासांत सर्व मंडळींच्या प्रकृतीवर देखरेख ठेवण्याचें काम डॉ. मलहोत्रा यांजकडे होतें. चित्रपट व उपयुक्त फोटो काढणें हें काम उत्तरप्रदेशाच्या माहिती खात्यांत असणारे एक अधिकारी श्री. चंद्र यांजकडे होतें. शारिरीय मानवविज्ञान व रचनाशारीर यांतील तज्ज्ञ म्हणून माझी योजना झाली होती. लखनौ विद्यापीठांतील भूगर्भशास्त्रज्ञ डॉ. तिवारी, डॉ. सहानी बोटॅनिकल इन्स्टिटयटमधील उत्खनितावशेष-वनस्पतिशास्त्रज्ञ ( Palaeon-Botanist ) डॉ. बोस, व अलाहाबाद विद्यापीठांतील मृत्तिकारसायनशास्त्रज्ञ डॉ. घोष, अशा तीन तज्ज्ञांचा या मोहिमेंत अंतर्भाव केला होता. गिर्यारोहणाचा प्रत्यक्ष अनुभव व माहिती असणारे श्री. शर्मा हे जयपूर विद्यापीठांतील वैद्यकाचे विद्यार्थी आमच्याबरोबर होते.

आम्ही सर्वांनीं ता. १६ मे १९५६ रोजीं लखनौ सोडलें, व नॉर्थ ईस्टर्न रेल्वेनें, तिच्यावरील काठगोडाम हें अंतिमोत्तर स्टेशन १७ मे रोजीं गांठलें. स्टेशनला लागूनच हिमालयीन पहाड सुरू होतो. तंबू, खाद्यपदार्थ, शास्त्रीय उपकरणें, जमीन खोदावयास लागणारीं हत्यारें, वैयक्तिक सामान व आम्ही, इतक्यासाठीं दोन बसगाड्यांची योजना केली होती. सर्व सामानासकट आम्ही या बसगाड्यांतून हिमालयांत बांधलेल्या पक्क्या सीमेंटकॉंक्रीटच्या सडकेनें प्रवास सुरू केला. नैनिताल बाजूला टाकून आमच्या बसगाड्या थेट राणीखेतला आल्या. याठिकाणीं आम्ही सहा भारवाहक मजूर बरोबर घेतले, व लगेच पुढें निघालों. त्याच संध्याकाळीं आम्ही



अनुक्रमणिका








काठगोडामपासून सुमारें १०० मैलावर असणाऱ्या कौसानी या पहाडी गांवाला पोचलों. तेथें वन-खात्याच्या कुटीरामध्यें रात्रीं वसती करून, ता. १८ मेला सकाळीं निघालों. गरुड गांवांतून जाणाऱ्या सडकेनें, वैजनाथ या गांवावरून, डांगोली मुक्कामास दोन तासांत पोचलों. काठगोडाम ते डांगोली ११० मैल अंतर आहे, व डांगोलीपर्यंत मोटारगाडीची सडक आहे. ही सडक सर्वच्या सर्व पहाडांतूनच आहे. डांगोलीच्या पुढें मोटारगाड्या जात नाहींत. यापुढील प्रवास पायींच करावा लागतो. घोडीं व खेचरें मात्र जाऊं शकतात. हें लक्षांत घेऊन सामान वाहण्याकरितां पंधरा-सोळा खेचरें भाड्यानें ठरविलीं, व चढ-उताराच्या वेळीं उपयोगी पडणाऱ्या काठ्या हातीं घेऊन ता. १९ मेला आह्मी डांगोली सोडलें.

## खेचरपथानें प्रवास

हा प्रवास पायीं करावयाचा असून, आमचा मार्ग खेचरपथाच्या (Mule track) नमुन्याचा होता, व अशा मार्गानें आमचा प्रवास रोमहर्षक, अवघड व वनश्रीच्या सौंदर्यानें नटलेल्या भागांतून होणार ह्यामुळें आह्मी मार्ग आक्रमिण्यास फारच उत्सुक झालों होतों. खेचरपथ हा खेचरें जाण्या-पुरतांच अदमासें ५-५॥ फूट रुंदीचा असून, तो एका पहाडाच्या अंगावर चढे व तसाच खालीं घळींत उतार होऊन, पुनः दुसऱ्या पहाडाच्या अंगावर चढे. असे चढउतार एकसारखे करावे लागत. चढउतारांची मर्यादा कधीं कधीं तीन चार हजार फुटापर्यंत असे. एका बाजूला खोल दरी व दुसऱ्या बाजूला भिंतीसारखा उंच पहाड असा आमच्या मार्गाचा थाट असे. दरींतून पाण्याचा प्रवाह, किंवा बाल्यावस्थेंतील एखादी नदी असाय-चीच. अशा वाटेनें जात जात आम्ही अंदाजें ९ मैलांवर असणारें ग्वाल्डम् हें पहाडी गांव गांठलें, पण तेथें न थांबतां, ग्वाल्डमूच्या पलीकडे असणारी पिंडार नदी झुलत्या पूलावरून ओलांडली, व रात्रीं ९ च्या सुमारास देवल या गांवीं मुक्काम केला.

ता. २० मेला देवलहून बग्रीगडला जाऊन नंतर ता. २१ मेला बग्रीगडाहून वाण या पहाडी गांवा-कडे जाण्यास निघालों. डॉ. धीरेन् मुजुमदार देव-लच्या नंतर घोड्यावरून जात असत. मी घोड्यावर बसण्याचें नाकारलें होतें; परंतु बग्रीगडला मी व डॉ. मल्होत्रा अशा आह्मी दोघांनीहि घोड्यावरून वाटचाल करावी असा सर्वांचा आग्रह होऊन, आम्ही घोड्यावर स्वार झालों व वाणला निघालों. पहाडांतील रस्त्यानें घोड्यावर बसून जाणें ही एक कसरत आहे. ५ फूटी खेचरपथावरून घोडें चालतें तें अगदीं दरीच्या बाजूच्या अक्षरशः कडेवरून, तें इतकें कीं, घोड्यावरील व्यक्तीची दरीकडील अर्धी बाजू थेट दरीवरच येते. दरींत आपण कोसळतों कीं काय अशी बसणाऱ्याला सारखी भीति वाटते. दरी तरी सामान्य असते कां ? छे, विहिरीसारखी निदान एक दोन हजार फूट खोल. प्रत्यक्ष मृत्यूच एकसारखा आपल्या एका अंगाला आपल्याबरोबरच प्रवास करीत आहे, व झडप घालण्याची संधी पहात आहे, असें वाटे. शिवाय सर्वच्या सर्व वाटचाल घोड्यावरून करणें शक्य नसतें. रस्ता सपाट असेल, किंवा साधारणपणें चढ-उतार सौम्य असतील तर घोड्यावर बसणें शक्य असतें. विशेषतः उतार फारच असेल तर घोड्या-वरून उतरणेंच श्रेयस्कर असतें. माणूस काय किंवा घोडा काय दोघांनांहि उतार उतरणें कठीण असतें. घोडेस्वाराच्या भारानें घोड्याच्या पुढच्या पायांवरचा भार वाढून घोडा पडण्याची भीति असते. एवंच, घोड्यावर बसण्यापेक्षां पायीं जाणें हेंच बरें. पायीं चालतांना सभोंवतालच्या वनश्रीचें सौंदर्य मनमुराद लुटतां येतें, व श्रम होत असले तरी मन प्रसन्न असतें. तेंच घोड्यावर बसायचें म्हटलें कीं जीव मुठींत धरून बसायचें. शारीरिक श्रम कमी पण मन मात्र ताणलें जातें. अशामुळें कोठली वनश्री आणि कसचें काय ! अर्थात एक दोन दिवसाच्या सरावानंतर मग हळुहळु भीति कमी होत जाते.








बग्रीगडहून वाणला त्याच दिवशीं आम्ही पोंचलों. वाणची उंची समुद्रसपाटीपासून ९५०० ते १०००० फूट आहे. कोसानी ४००० फूट, डांगोली ४७००, देवल ४०००, बग्रीगड ६००० फूट उंचीवर आहेत. या प्रवासांत पाईन्, सायप्रस्, देवदार, वेळू, ऱ्होडेंड्रन्, फर्न, विंचवाचीं झाडें, रानगुलाब व इतर नांवें माहीत नसलेलीं अनेक झाडें आढळलीं. सर्व वृक्षांत सायप्रस् हें झाड फारच उंच वाढतें. तो खरोखरच गंगनचुंबित वृक्ष भासतो. सायप्रस्ची उंची २०० ते २५० फूट इतकी वाढूं शकते. प्रवासांत उत्तरोत्तर समुद्रसपाटीपासून उंची वाढत होती, व त्याचबरोबर थंडीहि वाढत होती.




नं १ नकाशा
रूपकुंडाच्या प्रवासमार्ग -----
डांगोली ते बागचू

## ' वृक्षमर्यादे'च्या पलीकडे

वाणच्या मुक्कामीं जवळचें बरेचसें सामान तेथेंच ठेवून दिलें. पुढील प्रवास कठीण, खेचरांना न करतां येण्याजोगा असल्यामुळें, सामान मजुरांकरवीं नेणें भाग पडतें. यापुढें १०,००० फूट उंचीच्यावर जावयाचें होतें. १०,००० फूट उंचीच्यावर मोठीं झाडें वाढत नाहींत, म्हणून या उंचीला वृक्षमर्यादा ( Tree-line ) म्हणतात. या उंचीच्यावर वृक्ष हळू हळू कमी होत जाऊन, कांहीं झुडुपें व एक प्रकारचें चराऊ गवत मात्र वाढूं शकतें. १४००० फूट उंचीच्या मर्यादेपर्यंत हीं झुडुपें व गवत आढळतें. १४००० फुटांच्यावर हळूहळू नुसता नंगा पहाड मात्र शिल्लक उरतो, व तेथूनच पहाडावर बर्फ आढळण्याला सुरुवात होते. ही बर्फ किंवा हिममर्यादा होय. आम्ही तिघे घोड्यावर, तरुणमंडळी पायीं, सामान मजुरांच्या अंगाखांद्यावर अशा थाटांत वाणपासून आम्ही ४० माणसें पहाड चढूं लागलों, व १२००० फूट उंचीवरची पहाडाची अग्रधार गांठली. धारेच्या अनुरोधानें प्रवास करीत करीत आठ मैलांवर असणारे ' पलवल्ला ' ह्या मुक्कामाच्या ठिकाणीं आलों. इकडील भागांत १०,००० फूट उंचीवर मनुष्यवस्ती नाहीं. पलवल्ला हें गांवाचें नांव नाहीं, नुसतें ठिकाणाचें नांव आहे. पलवल्लयास पोंचतांना उंच झाडें कमी होत होत, झुडुपें व गवत तेवढें शिल्लक राहिलें. पलवल्लयाची जागा समुद्रसपाटीपासून १२,००० फूट उंचीवर आहे. तीनहि बाजूंनीं पहाड, व चौथी बाजू नाटकगृहांतील रंगभूमीप्रमाणें खुली असून, या खुल्या बाजूनें आसमंतात् दूरवर दृष्टी जाऊं शकत होती, व दिसणारा देखावा फारच विशाल व रम्य होता. रांगेनें उभ्या केलेल्या सैनिकांप्रमाणें, १४००० ते २३००० फूट उंचीचीं बद्रिकेदार, चौखांबी, कॅमेट, नंदाघुमटी व त्रिशूळ हीं हिमाच्छादित शिखरें येथून दिसतात. जणुं पहावयास सुलभ

जावींत म्हणूनच कीं काय रांगेनें आपल्या अगदीं-जवळ उभीं केलीं आहेत असें वाटतें. सूर्यप्रकाशानें न्हाऊन तीं तळपत आहेत, व त्यांच्या कमरेइतक्या उंचीला ढगांचा पाठशिवणीचा खेळ चालला आहे, हें पाहतांना जवळजवळ देहभान हारपतें. आम्ही उभे असलेली जागा व हीं गिरिशिखरें यांच्या दरम्यान प्रथम नदी असलेली खोल दरी; दरीच्या दुसऱ्या अंगाला, आमच्या उंचीइतकाच बर्फ अंगावरून रेघारेघांनीं पडलेला पहाड, व या पहाडाच्या लगेच पलीकडे, वर सांगितलेलीं शिखरें दिसत होतीं.

वाणला पोचल्यापासून आह्मांस हवेच्या विरलतेची जाणीव व्हावयास सुरुवात झाली होती. वाट चालत असतानां जास्त थकवा वाटूं लागे. पलवल्ल्यास रात्रीं झोपेंत मध्येंच श्वासोच्छ्वासहि थांबे.

पलवल्ल्याच्या पुढचा मार्ग फारच विकट आहे. आतांपर्यंत खाशा वृद्धमंडळीस बसावयास घोडीं होतीं. पण यापुढें सर्वच सारखे. सर्वांनीं पायींच चाललें पाहिजे, अशी वाट आहे. २३ मेला आम्ही सर्व पायींच निघालों. यापुढें निश्चित असा मार्ग नाहीं, कीं रुळलेली पायवाट नाहीं. कित्येक जागीं ८० ते ९० अंशापर्यंत चढा असलेला चढ चढणें भाग पडे. चढ कसला ? भिंतच ती ! एरवीं बराच वेळ पहाडाच्या अंगावर असणाऱ्या ६५ ते ७० अंश उतारावर असणाऱ्या मोठमोठ्या पाषाणांच्या राशींमधून तोल सांभाळीत मुंगीच्या पावलानें जावें लागे. तोल गेला कीं गडगडत ३०००–४००० फूट खोल दरींत पडण्याची भीति वाटे. कित्येक वेळां पर्वताच्या अग्रधारेनें जावें लागे. अशा वेळीं दोनहि बाजूस खोल दऱ्या असावयाच्या. अशा प्रसंगीं अक्षरशः नाकासमोर पाहूनच चालावें लागे. इकडे तिकडे मान वळविण्याची सोय नसे. मुठींत जीव धरून, आम्ही विश्वविद्यालयीन नागर मंडळी, हळूहळू मार्ग आक्रमीत, दहा तासांनीं, आठ मैलावर असणाऱ्या बागचू या मुक्कामाच्या ठिकाणीं पोंचलों. बागचू समुद्रसपाटीपासून १३५०० फूट उंचीवर आहे. पलवल्ल्यासारखे तीन बाजूंनीं पहाड व एक बाजू मोकळी असें हें ठिकाण आहे. मुक्कामाच्या आसपास खाचखळग्यांतून बर्फ असून, हिमोद्भव, स्वच्छ व अत्यंत थंड पाण्याचा झरा कँपच्या जवळून वहात होता. चांदण्याचे दिवस होते. जवळच असलेली नंदाघुमटी रात्रीं चांदण्यांत आकाशांत चकाकत होती. जणूं काय निसर्गाच्या पटावरील एक भव्य चांदीची सोंगटीच आमच्यापुढें ठेविली आहे. दुसरे दिवशीं रूपकुंड प्रत्यक्ष दिसणार, म्हणून ही शेवटची मोहीम कशी करायची याचा बेत ठरवून रात्रीं झोंपलों.

२४ मेला सकाळींच, श्री. जोशी व पहाडी माणसांपैकीं नेत्रसिंग, हुकूमसिंग व हिंमतसिंग या चौघांनीं प्रथम रूपकुंडास जावयाचें, व तेथील परिस्थितीची पहाणी करून खालीं कँपमध्यें निरोप पाठवावयाचा असें निश्चित होऊन, हीं चार मंडळीं रूपकुंडाला गेलीं. बागचू १३५०० फूट उंचीवर तर रूपकुंड १७५०० फूट उंचीवर आहे. दुपारीं वरून निरोप आला कीं रूपकुंडांत बरेंच बर्फ आहे, बाकीं सर्व कांहीं ' आलबेल ' आहे. हा निरोप हुकुमसिंग व हिंमतसिंग यांनीं आणला. दुसरे दोघे वरच रूपकुंडाजवळ असणाऱ्या ' बगवा बासा ' या ठिकाणीं रात्रीं वसती करणार होते, म्हणून आम्ही खालून यांचे बिछाने, व शाकरोटी वर पाठविली. रात्रीं पाऊस, वादळ व हिमवृष्टि यांचा रूपकुंडाच्या क्षेत्रांत इतका कांहीं जोर झाला कीं, वर बगवा बासा येथें रात्रीं मुक्कामास राहिलेल्या श्री. जोशी व नेत्रसिंग यांच्या सुरक्षिततेविषयीं काळजी वाटूं लागली. एका खडकाच्या कपारींत त्यांना रात्र काढावी लागली. आम्ही देवलला असतानांच दर्शनार्थ नुकतेच रूपकुंडास जाऊन आलेल्या पहाडी लोकांनीं रूपकुंडावर दहाबारा फूट बर्फ आहे, म्हणून बातमी दिली होती, ती खरी ठरली होती; इतकेंच नव्हे तर आणखीहि बर्फ पडलें होतें. इतके कष्ट सोसून रूपकुंडाजवळ येऊन पोचलों, व या परिश्रमांचा कांहीं उपयोग न होतां रूपकुंडांतील अस्थींची पाहणी जागच्या जागीं करतां येत नाहीं










हें निश्चित ठरून आमची मनें खिन्न झालीं. परंतु निसर्गाच्या घटना कोण थांबवूं शकतो ! प्रवास करीत असतांना पहाडी लोकांच्या तोंडून रूपकुंडाची माहिती, आख्यायिका व गीतें ऐकून आमच्या उत्सुकतेचा पारा वर चढला होता. हिमानें व वृष्टीनें आम्ही व आमची मनें गारठून गेलीं, व नैराश्याचें वातावरण पसरलें. आल्यासारखें रूपकुंड डोळयांनीं पहावें; व त्याला प्रदक्षिणा घालावी ( धार्मिक विचारानें नव्हे, पण पाहणी करण्याकरितां ) या हेतूनें ता. २५ मे रोजीं/इतर खालची मंडळी वर गेली. प्रथम १५५०० फुटावर असणाऱ्या कैलवा विनायकाचें दर्शन घेतलें व मूर्तीपुढें नारळ ठेविला. सभोंवार पडलेल्या भुसभुशीत बर्फामध्यें विनायकाची नयनमनोहर मूर्ति फारच शोभत होती. ठिकठिकाणी चित्रपट घेत, व सर्व मंडळी आ पआपल्या कॅमेऱ्यानें अनेक फोटो घेत घेत, रूपकुंडाजवळ पोंचलीं. रूपकुंडांत किती बर्फ पडलें आहे याचा अजमास घेतला, तो तें १५ फूट तरी असावें असें दिसलें. याच्या खालीं दडलेल्या अस्थि मोकळया करणें दूरापास्त होतें. अभ्राच्छादित आकाश असल्यामुळें वादळ व हिमवृष्टि होण्याचा दाट संभव होता. परत फिरणें शहाणपणाचें होतें म्हणून सर्वजण परत खालीं बागचूला आलों. त्याहि रात्रीं वादळ व पाऊस झाला. ता. २६ मेला आम्ही परत फिरलों.




## रूपकुंड हें पूजास्थान

रूपकुंड म्हणजे शेंसवाशें फूट व्यास असणारा, चहाच्या बशीसारख्या आकाराचा, पर्वताच्या माथ्यावरील खोलगट भाग होय. रूपकुंडाची पूर्वोत्तर पार्श्वभूमि त्रिशूळ या गगनभेदी पर्वतानें झाली आहे. २३००० फूट उंचीच्या या त्रिशूळाचीं तीन अग्रें आकाशावर रोंखलेलीं, बर्फरूपी भस्मानें लडबडलेलीं अशी पाहतांच मनुष्य स्तिमित होतो. रूपकुंडास त्रिशूळाकडेच्या बाजूस खडी पहाडी भिंत आहे. ही भिंत व त्रिशूल यांच्या दरम्यान मोठमोठ्या शिळा पडलेल्या असून त्यावरहि बर्फ विखुरलेलें आहे. शिळांनीं भरलेल्या या क्षेत्रास ' शिलासमुद्र ' असें नांव आहे.

ज्या प्रदेशांतून आम्ही रूपकुंडाकडे गेलों, त्या प्रदेशांत पहाडी लोकांची वसति आहे. या लोकांचें पूजादैवत नंदादेवी हें होय. रूपकुंडापासून थोडया अंतरावर नंदादेवी हें शिखर आहे. वर्षांतून कधीमधीं शिलासमुद्र, रूपकुंड व कैलवा-विनायक यांच्या दर्शनाकरितां लोक जात असतात. या पूजास्थानांबद्दल या लोकांमध्यें बरींच गीतें व आख्यायिका प्रचलित आहेत. देवलहून बग्रीगडला जातांना हीं गीतें कांहीं पहाडी लोकांच्या तोंडून आम्हांस ऐकावयास मिळालीं. वर्षा-दोन वर्षांनीं, देवलजवळच असणाऱ्या एका गांवांतून भगवतीची पालखी रूपकुंड, शिलासमुद्राकडे जाते असेंहि समजलें. भगवतीची पालखी ज्यावेळीं जाते, त्यावेळीं बागचू – जेथें आमचा शेवटचा कॅंप होता तेथें–बरेच म्हणजे तीन चार हजार यात्रेकरू जमतात. या मेळयाचा बागचूला तीन चार दिवस मुक्काम असतो. ( ठिकाणांच्या नांवाचे उल्लेख येतील ते नकाशा नं. २ मध्यें पाहावेत. ) बागचूहून यात्रेकरू वर चढून प्रथम कैलवा-विनायकाची पूजा करतात. नंतर जोरगल्लींत आणखी एक गणेशमूर्ति आहे तिची पूजा करतात. शिलासमुद्राची पूजा करून तुपानें माखलेले








दगड त्यांत फेकतात. या पूजाप्रकारास घृतस्थापना किंवा घीस्थापना म्हणतात. जवळपास भगवतीप्रीत्यर्थ बकऱ्याचा बळी देतात. रूपकुंडांत जाऊन पितरांचें तर्पण करतात. याशिवाय चांदणेघट, लाटकुबडी, तांतडासिंग अशीं दुसरीं दुय्यम पूजास्थानें त्या क्षेत्रांत आहेत. सर्व वयाचे, आबालवृद्ध स्त्रीपुरुष, सशक्त-अशक्त प्रकृतीचीं माणसें या यात्रेला जातात. गंगा-प्रांतांत जसें गंगेचें माहात्म्य असतें, तद्वत् नेपाळच्या पश्चिम सीमेवर असणाऱ्या या पहाडी प्रांतांत त्रिशूळ, शिलासमुद्र व रूपकुंड यांचें माहात्म्य आहे.

रूपकुंडांत अस्थि आहेत ही बातमी आम्हां नागर माणसांना नवीन आहे; पहाडी लोकांना नेहमीच्या परिचयाची आहे. इतक्या अस्थि तेथें कशा आल्या यासंबंधीं त्या प्रदेशांत आख्यायिका व गीतें प्रचलित आहेत, व तीं आम्हाला आमच्या प्रवासांत कित्येक वेळां ऐकावयास मिळालीं. ठिकठिकाणच्या कथांच्या तपशिलांत थोडे थोडे फरक होते तरी कथाभाग मूलतः एकच आहे. या कथा हृदयंगम गीतांत गुंफलेल्या असून, येथील पहाडी लोक हीं गीतें मोठ्या भक्तिभावानें म्हणतात. मूळ कथाभाग मनोरंजक असून त्याचा सारांश पुढें देत आहे.

**भगवतीचें गाणें**

भगवतीचें गाणें म्हणजे जसधर राजा व त्याची बलपा राणी यांची कथा होय. हिमालय राजाला आठ मुली होत्या. सगळ्यांत मोठीचें नांव बलपा व सगळ्यांत धाकटीचें नंदा. बलपाराणीचें लग्न कनोजचा राजा जसधर याच्याशीं झालें. मधल्या मुलींचीं लग्नेंहि निरनिराळ्या राजांशीं झालीं. नंदादेवीनें मात्र आपण होऊन, हिमालय पर्वतांत गिरिकंदरीं वास करणाऱ्या शिवजीशीं लग्न केलें. शिवजी हा कफल्लक, स्वेच्छाचारी वैरागी व तपस्वी होता. नंदादेवीच्या बहिणींना, नंदादेवीचा पति व तिचें सासर आपल्या बरोबरीचें नाहीं असें वाटे. नंदादेवीकडे व तिच्या पतीकडे त्या तुच्छतेनें पहात. तिच्याशीं संबंध ठेवणें देखील त्यांना हलकेपणाचें वाटे. शिवजीवर पूर्णपणें अनुरक्त असणारी नंदादेवी शिवजीबरोबर राहून संसार करी.

शिवजीचें वसतिस्थान व संचारक्षेत्र शिलासमुद्र, रूपकुंड व त्रिशूल यांच्या आसपास असे. कैलवा-विनायक या प्रदेशाच्या सुरवातीलाच वसति करून रहात असे. नंदादेवी म्हणजे भगवती होय.

बलपा राणीचा नवरा जसधरराजा, दुर्गुणी, दुर्व्यसनी व अहंमन्य होता. कालांतरानें बलपाराणीच्या मनांत आलें कीं, आपण आपल्या वैभवानें नंदादेवीस दिपवावें. शिवजीशीं लग्न करण्यांत केवढा मूर्खपणा झाला आहे, हें तिला समजूं द्यावें. कोपिष्ठ शिवजीं घरीं असतांना हा बेत सिद्धीस जाणें शक्य नसल्यामुळें, शिवजी तपश्चर्येला कोठेंतरी अज्ञातस्थळीं निघून गेला आहे अशी संधि साधून, जसधर राजा व बलपा राणी मोठ्या थाटामाटानें, सर्व लवाजमा, शिपाईप्यादे बरोबर घेऊन शिलासमुद्राकडे निघाले. यावेळीं बलपाराणी गरोदर होती. त्यांच्याबरोबर वेश्यांचा एक ताफाहि होता. बागचूच्या पुढें आल्यावर रात्रीं त्यांचा मुक्काम पथारनचौनीस पडला. या ठिकाणीं विलासी राजानें वेश्यांचा नाच केला. इकडे कैलवा-विनायकाची नजर जलधर राजाच्या हालचालींवर होतीच. विनायकास या मंडळींचें वर्तन विचित्र व पापी वाटलें. देवद्वारीं वेश्यांचा नाच करणाऱ्या या मंडळींचा राग येऊन, शाप देऊन त्या वेश्या त्यानें मारून टाकल्या. या वेश्या तीन होत्या. धुंदींत असणाऱ्या राजानें त्या मृत वेश्या पथारनचौनींत पुरून टाकल्या. वेश्यांना पुरून टाकून राजाराणी व त्याचे लोक रूपकुंडाच्या रोखानें निघाले. त्यांची वाट कैलवा-विनायकाच्या वसतिस्थानावरून जात असूनहि, त्यांनी विनायकाची गांठ घेतली नाहीं कीं कांहीं वास्तपुस्त केली नाहीं. दिमाखांत तसेच पुढें गेले. बगवा बासाच्या थोडें पुढें गेल्यावर बलपाराणीला प्रसूतिवेदना सुरू










झाल्या व ती बाळंत झाली. (ज्या ठिकाणीं बलपाराणी प्रसूत झाली असा समज आहे, त्या जागेस ' बल-पाराणीका फुलौरा ' असें नांव आहे). कोणी ढुंकूनहि न पाहिल्यामुळें विनायक क्रोधायमान झालाच होता. " देवदर्शनास येणारे हे कसले लोक ! पथारन-चौनींत वेश्यांचा नाच काय करतात ! मेलेल्या वेश्यांना पुरून टाकून तशाच अपवित्र स्थितींत देवदर्शनास काय जातात ! माझी वास्तपुस्त नाहीं ! माझें दर्शन घेतल्याशिवाय कोणीहि पुढें जात नाहीं ही रूढि, यांनी धाब्यावर बसविली ! स्त्री बाळंत काय होते ! वैभवाचा दिमाख तो किती ! छेः यांचीं मनें पापी आहेत, व हे जगण्यास लायक नाहींत ! " असा विचार करून विनायकानें पुनः एकदां शापप्रयोग करून त्या मेळ्यांतील सर्वांस मारून टाकलें. भगवतीस म्हणजे नंदादेवीस हें वृत्त कळलें. स्वतःच्याच कर्मानें आपली बहीण व सर्व मंडळी नाश पावली असल्यामुळें, भग-वतीनें विनायकास दोष दिला नाहीं. त्यानंतर मृतांस स्वर्ग मिळावा म्हणून अस्थि रूपकुंडांत टाकल्या गेल्या.

## वेश्यांना पुरलेली जागा

रूपकुंडाकडे, बागचूहून जातांना पथारनचौनी हें ठिकाण लागतें. पथारनचौनी म्हणजे फत्तर नाच-ण्याची जागा हा अर्थ होतो. या ठिकाणीं रांगेनें तीन प्रचंड खळगे आहेत. या खळग्यांतून, नाच करणाऱ्या तीन वेश्यांना पुरलें असें पहाडी लोक समजतात. आख्यायिकेंतील तथ्य अजमावण्याकरितां, त्यांतील एक खळगा आणखी पाच सहा फूट आम्ही उकरला. परंतु त्यांत कांहीं मिळालें नाहीं.

आमच्याबरोबरचे भूगर्भशास्त्रज्ञ डॉ. तिवारी यांचे म्हणणें पुढीलप्रमाणें होतें, तें आम्हांला पटलें. पहाडावरील पाणी उतारावरून खालीं वाहतें. कित्येक वेळां हा उतार एकसारखा नसून, मध्येंच सपाट जागा असते. या सपाट जागेची जमीन भुसभुशीत असली म्हणजे वरून येणारें पाणी तिच्यांत जिरतें. भुसभुशीत जमिनीच्या तळाचा व त्यापुढील उता-राचा संबंध असला तर, हें पाणी त्या ठिकाणीं जिरतें, पण झऱ्याच्या रूपानें स्वतंत्रपणें खालून भुई-तून दुसरींकडे उतारास लागतें. कांहीं कारणांनीं पाण्याचा प्रवाह बदलतो, व पाणी जिरण्याची जागा उघडी पडून कोरडी होते, व त्याठिकाणीं पद्धतशीर गोल खळगा दिसूं लागतो. पथारनचौनींतील खळगे या स्वरूपाचे आहेत.

## या पुराणकथेवरून निघूं शकणारे निष्कर्ष

शापप्रयोगासारखा पौराणिक पद्धतीचा कथाभाग बाजूला ठेवून या कथेंतून पुढील तर्कशुद्ध निष्कर्ष काढतां येतील :

१. कनौज प्रांतांतील लोकांचा रूपकुंडाशीं एके-काळीं घनिष्ट संबंध असावा.

२. बर्फघसऱ्यासारख्या (Avalanche) नैस-र्गिक उत्पातानें कनौजप्रांतीय जनमेळ्याचा एकदम नाश होऊन, मग कोणीतरी त्यांचीं प्रेतें रूपकुंडांत टाकलीं असावींत.

३. रूपकुंडाच्या आसपास असणाऱ्या पहाडी प्रांतांतील लोक मूळचे कनौजचे असावेत.

## अस्थीवरून निष्कर्ष काढण्याची पद्धति

मनुष्यशरीरांचे अवशेष कोठेंहि सांपडले तर त्यावरून निष्कर्ष काढण्याकरितां तर्कशुद्ध पद्धतीचा अवलंब करावयास पाहिजे. केवळ कल्पनांच्या भराऱ्यांनीं सत्य सांपडणार नाहीं. संशोधनाचें कार्य पुढील दिशेनें व्हावयास पाहिजे :

१. अवशेष कोणत्या स्वरूपाचे आहेत ? नुसत्या अस्थि, कां मांसासहित शरीरभागहि आहेत ? पडलेल्या ठिकाणीं हे कशा पद्धतीनें पडले आहेत ? जमिनींत एकावर एक आहेत कीं सर्व एकाच पातळींत आहेत ?








२. अवशेष स्त्री, पुरूष व मुलें यांचे आहेत का ? या मानवव्यक्ति प्राचीन आहेत कीं अर्वाचीन आहेत ?

३. त्या सर्वांचे मृत्यू एकदम एकावेळीं झाले कां त्यांचे मृत्युकाल भिन्न भिन्न होते ?

४. शरीरावशेषांच्या आसपास इतर कोणत्या वस्तू आढळतात ? त्या वस्तू शरीरावशेष ज्या व्यक्तींचे आहेत त्या व्यक्तींच्याच होत्या कां ? आज आढळणाऱ्या वस्तु तेवढ्याच तेथें प्रथमपासून होत्या कां ?

५. रूपकुंडांतील व्यक्ती एतद्देशीय होत्या कीं परदेशीय होत्या ? ते यात्रेकरू होते, सैनिक होते कीं आणखी कोणत्या पेशाचे होते ?

वरील पांच प्रश्नांचीं उत्तरें, समर्पक व संशयातीत स्वरूपांत मिळणें हें अशक्य आहे. एक तर हीं उत्तरें मिळण्यास रूपकुंडाची मनसोक्त शास्त्रीय पाहणी करावयास मिळाली पाहिजे. व दुसरें हें कीं, मनसोक्त पाहणी करूनहि उत्तरें मिळूं शकतील किंवा नाहीं याची वानवाच आहे.

आमच्या मोहिमेबरोबरच, केन्द्रीय सरकारच्या मानवविज्ञानखात्यानें मोहीम काढली होती. दोनहि मोहिमांना रूपकुंडाची पाहणी शास्त्रीय पद्धतीनें करतां आली नाहीं. यानंतर सप्टेंबर-आक्टोबर १९५६ मध्यें पुनः अलाहाबाद विद्यापीठाची व इतर मोहिमा रूपकुंडावर गेल्या होत्या. त्यांना रूपकुंडाची शास्त्रीय पाहणी करतां आली नाहीं असें वृत्त प्रसिद्ध झालें आहे. रूपकुंडावरील बर्फ हटलें नाहीं. अशा परिस्थितींत जीं कांहीं माहिती उपलब्ध आहे तीवरून कांहीं अंदाजवजा निष्कर्ष काढतां येतील.

## रूपकुंडांतील अवशेषांसंबंधी कांहीं निष्कर्ष

१. रूपकुंडांत बरेच मानवी अवशेष आहेत हें प्रत्यक्ष कांहींनीं पाहिलें आहे. श्री. अय्यर यांनीं बर्फ कमी झालेल्या रूपकुंडाचा फोटो प्रसिद्ध केला आहे, त्यांत बरेच मानवी अवशेष रूपकुंडाच्या परिसरांत विखुरलेले दिसतात, म्हणून रूपकुंडांत बरेच मानवी अवशेष आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं.

२. या अवशेषांपैकीं, कांहीं थोडे अवशेष व इतर वस्तु, लखनौ विद्यापीठाला मिळाल्या. त्यांचा अभ्यास करून जे निष्कर्ष निघतात ते असे : पुरुष व स्त्री या दोघांचेहि रूपकुंडांत अवशेष आहेत. या व्यक्ती प्राचीन नसून अर्वाचीन आहेत. अर्वाचीन म्हणजे गेल्या दोन तीन हजार वर्षांपासून आजतागायतपर्यंत कालमर्यादा गृहीत धरावयास पाहिजे.

३. अर्वाचीन म्हणून म्हटलेल्या कालमर्यादेंत, कोण अगोदर मृत्यु पावला, कोण मागाहून पावला कां सर्वच एकदम मरण पावले, हें शास्त्रीय, तपशीलवार पाहणी केल्याशिवाय सांगतां येणार नाहीं. कांहीं अस्थींवर ओलसर मांसभाग, केस इ० आहेत, हीहि गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. हा समांस अवशेष अगदीं अलीकडचा किंवा तीनशें चारशें वर्षांपूर्वीचाहि असूं शकेल. रूपकुंड सतरा-अठरा हजार फूट उंचीवर असल्यामुळें, तेथें बहुतेक सर्व वर्षभर कमी अधिक प्रमाणांत बर्फ असतें. कमी झालेंच तर भाद्रपद-अश्विन महिन्यांत कमी होतें. यामुळें तेथील तपमान सदा थंड असणार. अत्यंत थंड म्हणजे हिमतपमानांत, मांस जसेंच्या तसें राहून वरींच वर्षे टिकतें असा अनुभव आहे. मृत्युकाल ठरविण्याच्या मार्गांत ही एक मोठी अडचण आहे.

४. शरीरावशेषांबरोबर इतरहि वस्तू तेथें आहेत, एवढेंच विधान सध्यां करतां येईल.

५. ते अवशेष कोणत्या पेशाच्या व्यक्तींचे आहेत, याचें उत्तर संपूर्ण पाहणीशिवाय देतां येणार नाहीं हें जरी खरें असलें, तरी उपलब्ध माहितीवरून कांहीं कयास बांधतां येतील. तेथील अवशेष ज्यांचे आहेत त्यांच्या मृत्युकालाविषयीं अनिश्चितता आहे हें प्रथम ध्यानीं घेतलें पाहिजे. तेथील कांहीं अस्थि समांस व कांहीं निर्मांस आहेत










यावरून कांहीं आधीं, कांहीं मागाहून मृत्यू पावले असण्याचा संभव आहे. म्हणून मृत्युकालासंबंधीं पुढील प्रश्न संभवतात :

अ. अवशेष ज्यांचे आहेत त्या सर्व व्यक्ती एकाच वेळीं जिवंतपणीं रूपकुंडांतच असतांना, बर्फ-घसरा किंवा सैन्याचा छापा अशा आकस्मिक कारणांमुळें त्यांना एकदम मरण आलें कां ?

ब. कांहींना रूपकुंडांतच मरण आलें असलें तरी, बाहेर कोठेंतरी मेलेल्यांचीं प्रेतें रूपकुंडांत आणून टाकलीं नसतील कशावरून ? किंवा वेळोवेळीं होणाऱ्या बर्फ-घसऱ्यामुळें बाहेरील प्रेतें रूपकुंडांत जमा झालीं नसतील कां ?

मृत्युकालासंबंधींचे हे विचार लक्षांत ठेवून मग पुढील कांहीं मुद्दे ध्यानांत घ्यावे लागतील.

( १ ) रूपकुंड हें पूजास्थान असून तेथें तर्पण करतात. म्हणजे और्ध्वदेहिक क्रिया करण्याची ती जागा आहे; ( २ ) आख्यायिका; ( ३ ) स्वत: मरण आणण्याची भारतांतील धार्मिक चाल; ( ४ ) रूपकुंड हें यात्रेचें ठिकाण आहे.

प्रथम, मरण आणण्याच्या धार्मिक चालीबद्दल स्पष्टीकरण केलें पाहिजे. भारत हें नांव ज्या राजामुळें आपल्या देशास मिळालें, त्या राजाचा बाप ऋषभ यानें यदृच्छेनें संचार करीत वनांत देहत्याग केला, असें भागवतांत म्हटलें आहे. अयोध्यापति रामचंद्रानें शरयू नदींत देहत्याग केला. भारतीय युद्धानंतर धृतराष्ट्र, गांधारी, विदुर व कुंती हीं पौरववंशांतील वृद्ध मंडळी अरण्यांत रहावयास गेलीं, व तेथें दैववशात् पेटलेल्या वणव्यांत त्यांनीं देहत्याग केला. पांच पांडव व द्रौपदी हे देहत्याग करण्यासाठीं हिमालयांत गेले. गिर्यारोहण करतां करतां एकेकाला मृत्यु येत गेला. ज्याला ज्याला मृत्यु आला त्याला तेथें तसेंच टाकून उरलेले पांडव पुढें जात राहिले. शेवटीं धर्म हा एकटाच उरला व सदेह स्वर्गास गेला, अशी कथा भारताच्या स्वर्गारोहणपर्वांत आहे. या प्रकारच्या देहत्यागास महाप्रस्थान म्हणतात. एकनाथ या सत्पुरुषानें गोदावरी नदींत देहत्याग केला. तुकाराम सदेह स्वर्गास गेले, यांतील रहस्य मार्मिक वाचक जाणतीलच. बद्रिकेदार, गंगोत्री, जम्नोत्री यांच्या यात्रा करतां करतां, कांहीं यात्रेकरू नदीच्या प्रवाहांत स्वत:स झोंकून देऊन देहत्याग करतांना आजहि आढळतात. हिमालय हा अरण्यांचें आगर आहे. तो ' देवतात्मा ' म्हणजे देवतांचें वसतिस्थान आहे. त्याच्यांतूनच जगाला पावन करणाऱ्या गंगा-यमुना उगम पावतात. अशा समजुती असल्यामुळें, महाप्रस्थानाच्या प्रकारानें पूर्वीं देहत्याग करीत होते व आजहि कोणी त्याचा अवलंब केल्यास तें समजणार कसें ?

मेलेल्या व्यक्तींचीं प्रेतें मृताला स्वर्ग मिळावा म्हणून गंगा-यमुना नद्यांसारख्या तीर्थांत सोडतांना आजहि आपण पहातों; मी प्रत्यक्ष पाहिलें आहे. तीर्थांत प्रेतें सोडण्याची चाल, चालू विषयाच्या अनुरोधांत लक्षांत ठेवावयास पाहिजे.

वरील सर्व विचारांच्या दिशा लक्षांत घेऊन बरीच अनुमानें निघू शकतात. बलपा राणीच्या आख्यायिकेवरून असें दिसतें कीं, रूपकुंडास तीर्थाची योग्यता फार प्राचीन काळापासून असावी. त्याच ठिकाणी स्वर्गप्राप्त्यर्थ प्रेतें टाकण्याचीहि चाल पूर्वीच्या काळीं असली पाहिजे. रूपकुंडाच्या आसपासचे लोक पूर्वीं तसें करीतहि असतील. निदान मृतांच्या अस्थींचें विसर्जन तेथें करीत असतील. रूपकुंडांत तर्पण करण्याची आजहि असणारी चाल हेंच सुचविते.

रूपकुंड यात्रेचें ठिकाण असल्यामुळें, यात्रेच्यावेळीं त्या परिसरांत कोणी मेल्यास बर्फांतच पडून रहात असेल. कालांतरानें, बर्फ घसऱ्यामुळें बर्फासह हीं प्रेतें रूपकुंडांत येऊन दाखल होत असतील. शिला-

समुद्र व जोरगल्लीच्या बाजूनें रूपकुंडाकडे स्वाभाविक उतार आहे, व शिलासमुद्र आणि जोरगल्लीं हीं दोन तेथील मुख्य पूजास्थानें आहेत, या दोनहि गोष्टी लक्षांत घेतल्यास, प्रेतें रूपकुंडांत जमा होण्याची शक्यता दिसून येते.

पूर्वीच्या काळी महाप्रस्थान पद्धतीनें देहत्याग करण्याची रीत होती. या रीतीचाहि अवलंब करून माणसें देहत्यागास तेथें जात असतील.

यात्रेच्या निमित्तानें किंवा इतर कोणत्या निमित्तानें रूपकुंडांत माणसें जमलेलीं असतांना बर्फघसऱ्यानें, किंवा शिलावर्षावानें त्या व्यक्तींना मृत्यु येत असेल. शिलावर्षाव हिमालयांत होत असतो, हा अनुभव आहे. रूपकुंडासंबंधी असें ऐकिलें कीं, तेथें मोठ्यानें ओरडलें कीं शिळा गडगडत पडण्याचा संभव असतो.

वर चर्चा केलेलीं सर्व कारणें रूपकुंडांत प्रेतें व मानवी अवशेष जमा होण्याच्या बुडाशीं असावींत. आणखी एक गोष्ट स्पष्ट दिसून येईल कीं, रूपकुंडांतील मानवी अवशेष जोरावरसिंगाच्या सैन्याचेच फक्त आहेत किंवा नानासाहेब पेशवे यांच्या परिवाराचेच फक्त असावेत अशी वस्तुस्थिति असणें शक्य नाहीं.

रूपकुंडाच्या उत्तरेस ५०–६० मैलावर तिबेट मध्यें प्रवेश करण्याजोगी खिंड आहे, असें म्हणतात. पूर्वी तिबेटी लोकहि या प्रांतांत येत असतील, व त्यांच्यांतहि रूपकुंडाची यात्रा करण्याची चाल असेल. आम्ही तपासलेली करोटी, भारतांतील मनुष्याच्या करोटीपेक्षां विशाल आहे, असें आरंभीं म्हटलें आहे. यावरून तिबेटी लोकहि रूपकुंडाला येत असतील, या विधानास पुष्टि मिळते.

सत्य काय आहे, हें कधींकाळीं समजण्याची शक्यता फारच थोड्या प्रमाणांत आहे, असा एकच निष्कर्ष शेवटीं निघतो ?

---

## आधुनिक राज्य

"तुम्ही डोळ्यांपुढें एखाद्या राजाचें चित्र आणा...माणूस खरा, परंतु अनेक गोष्टी सहज करूं शकणारा आणि इतर अनेकांवर नियंत्रण चालविणारा असा तो माणूस आहे. सारा देश त्याच्याच मालकीचा आहे. म्हणजे असें कीं इतर सर्व मालकांची मालकी त्यानें दिलेल्या संरक्षणामुळेंच कायम असते व म्हणून ते त्याला करभार चुकवीत असतात. तो कोणालाहि श्रीमंत करील वा दारिद्र्यांत लोटून देईल; कोणालाहि उच्च पदावर चढवील किंवा खालीं लोटून देईल; आपल्या इच्छेनुरूप कोणालाहि हद्दपार करील वा सुळावर चढवील; निर्माण करील वा नष्ट करून टाकील; लढाई करील वा शांतता राखील; संघटित करील, नियम लादील, मुभा देईल वा मनाई करील. त्याला जाब विचारणारें कोणीहि नाहीं...या चित्रापासून आपण आरंभ करूं या. अशी ही सर्वशक्तिमान् माणसाची कल्पना प्रथम आपण विचारांत घेऊं. आतां त्याचें सामर्थ्य कोणत्याहि प्रकारें कमी न करतां त्याच्यांतील सर्व मानवी अंश काढून टाका; वयोमर्यादेचा वा मृत्यूचा प्रश्न त्याच्याबाबतींत उद्भवत नाहीं असें समजा. कालाचें त्याच्यावर कसलेंहि नियंत्रण राहिलेलें नाहीं. येथेंच कार्यभाग संपत नाहीं. त्याची सारी संवेदनशीलता काढून घ्या; कारण त्या अमर वस्तूला हृदयाची मुळीं गरजच उरलेली नाहीं. ... ... इंद्रियें नकोत तसेंच हृदयहि नको. आतां मनासंबंधीं बोलावयाचें झाल्यास राज्याचें मन काय असेल हें मी तरी फारसें निश्चितपणें सांगूं शकणार नाहीं."

— पॉल व्हॅलेरी










प्रा. म. वा. मिराशी

# आन्तरराष्ट्रीय कीर्तीचे भारतीय वनस्पतिशास्त्रज्ञ प्राध्यापक बीरबल साहनी

१९४९ सालच्या एप्रिल महिन्याची नऊ तारीख. मध्यरात्रीचा सुमार असावा. एक महान् भारतीय वैज्ञानिक आपल्या सुविद्य पत्नीस अखेरचा संदेश देत होता. " आपल्या संस्थेचें भवितव्य आतां तुझ्या हातीं आहे. तिची नीट जोपासना कर ! " आपल्या जीवितकार्याच्या भवितव्याची चिंता या शब्दांत व्यक्तवून त्यानें या जगाचा अखेरचा निरोप घेतला ! दारावरची घंटा एकाएकीं निनादूं लागली.[१] भारतवर्षाची अपरिमित हानि जगजाहीर करीत असतांच भावी उत्तरदायित्वाचा जणुं सूचक इषारा ती देत असावी. आपल्या मृत्यूनें विज्ञानाचें, नि विशेषतः वनस्पतिशास्त्राचें, विश्व पोरकें करून जाणारा हा आन्तरराष्ट्रीय कीर्तीचा शास्त्रज्ञ म्हणजे प्राध्यापक बीरबल साहनी.

### थोडा जीवनवृत्तान्त

पश्चिम पंजाबांतील भेरा नामक गांवीं प्रा. साहनींचा जन्म झाला. १४ नोव्हेम्बर १८९१ हा त्यांचा जन्मदिन. त्यांचें घराणें सुसंस्कृत व घरंदाज होतें. लाहोर येथील सरकारी महाविद्यालयांत रसायनशास्त्राचे प्राध्यापक रुचिराम साहनी यांचा बीरबल हा द्वितीय चिरंजीव रुचिराम साहनींची अध्यापनासंबंधीं ख्याति असून पंजाबांतील शैक्षणिक क्षेत्रांत ते अग्रेसर होते. भारताच्या वैज्ञानिक प्रगतीविषयीं त्यांना फार आस्था असे. साहजिकच बीरबलला विज्ञानाचें बाळकडूं लहानपणींच मिळालें. १९२० सालीं प्रा. साहनींचा सावित्री सुरी नामक कन्येशीं विवाह झाला. श्रीमती साहनी या स्वतः वनस्पतिशास्त्राच्या पदवीधर असून प्राध्यापक साहनींनीं संस्थापिलेल्या संशोधन-संस्थेची धुरा अध्यक्ष[२] या नात्यानें पतीच्या निधनोत्तर त्या सांभाळीत आहेत.

### शैक्षणिक योग्यता

साहनींचें शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षण लाहोर येथेंच पार पडलें. त्यावेळीं डॉ. शिवराम कश्यप हे तेथील विद्यापीठांत प्राध्यापक होते. उत्तर-भारतांतील वनस्पतिशास्त्रविषयक अध्ययन-अध्यापनाचे आद्य प्रवर्तक म्हणून कै. कश्यपांना आज मान देण्यांत येतो. अध्यापनपटुतेबद्दल तर त्यांची भारतांत ख्याति होतीच; परंतु त्याबरोबरच पश्चिम हिमालयांत अनेकवार सफरी काढून त्यांनीं लिवरवर्ट्स् (liverworts) नामक वनस्पतींसंबंधीं जें मूलगामी संशोधन केलें त्याबद्दल भारताबाहेरहि त्यांना मान्यता प्राप्त झाली होती. वनस्पतिशास्त्रावरील प्रमाणभूत ग्रंथांत त्यांचीं संशोधनें समाविष्ट झालेलीं आहेत. लिवरवर्ट्स् वनस्पतींच्या उद्विकासांत ( evolution ) त्यांचा क्रमशः ह्रास ( reduction ) झालेला आढळतो हा सिद्धांत प्राध्यापक कश्यपांनी आपल्या मौलिक संशोधनांनीं केवळ सुस्थापितच केलेला नसून त्या उद्विकासाची निश्चित दिशाहि त्यांनी स्पष्टपणें समोर मांडली आहे.

अशा जगद्विख्यात प्राध्यापकाजवळ बीरबल साहनींनीं संशोधनाचे पहिले धडे गिरविले. कै. कश्यपांच्या अविरत परिश्रमाची, सतत कार्योद्योगाची, सूक्ष्म अवलोकनशक्तीची आणि प्रखर

१ ही अद्भुत बातमी त्यावेळी बऱ्याच वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली होती.
२ President Birbal Sahni Institute of Palaeobotany.








बुद्धिवैभवाची छाप साहनींच्या तरुण, संस्कारसुलभ मनावर पडून ती त्यांच्या भावी यशाला कारणीभूत ठरली असल्यास नवल नाहीं.

१९११ सालीं ते उच्च शिक्षणासाठीं केंब्रिज विद्यापीठांत दाखल झाले. तेथेंहि आपल्या सर्वंकष बुद्धिमत्तेनें त्यांनी चांगलें नांव कमाविलें. एमॅन्युएल महाविद्यालयांत ' फाउंडेशन स्कॉलर ' म्हणून काम करण्याची संधि त्यांना मिळाली. वनस्पतिविषयक संशोधनाबद्दल हार्डिमन पारितोषिकाचा मानहि मिळाला. याच अवधींत म्युनिक विद्यापीठाच्या उन्हाळयांतील वर्गाला उपस्थित राहून विख्यात वनस्पतिविशारद डॉ. गोबेल यांच्या मार्गदर्शनाचा त्यांनीं लाभ करून घेतला. त्याचप्रमाणें आपल्या इंग्लंडमधील आठ वर्षांच्या वास्तव्यांत जगद्-विख्यात पुरावनस्पतिशास्त्रज्ञ (Palaeobotanist) सर ए. सी. सीवर्ड यांच्यापाशीं साहनींनी स्वत:ची संशोधनकार्याच्या दृष्टीनें पद्धतशीरपणें तयारी केली. १९१९ सालीं लंडन विद्यापीठाची डी. एस्‌सी. ही पदवी मिळवून ते भारताला परतले. पुढें १९२९ सालीं त्यांनी केंब्रिज विद्यापीठाची ' एस्‌सी. डी.' ही बहुमानाची पदवी मिळविली.

## संशोधनकार्य

विलायतेंतील आपलें उच्च शिक्षण संपवून स्वदेशीं परतल्यावर प्रा. साहनींनी आपलें सारें आयुष्य वनस्पतिशास्त्राचें अध्यापन आणि संशोधन यांतच घालविलें. त्यांचा पुढील जीवनवृत्तान्त म्हणजे भारतांतील वनस्पतिसंशोधनाचा — विशेषत: प्राचीन वनस्पतींच्या अध्ययनाचा—इतिहास होय. त्यांनीं काशी, पंजाब व लखनौ विद्यापीठांत प्राध्यापक म्हणून काम केलें. १९२१ ते १९४९ पर्यंतची त्यांची लखनौ विद्यापीठांतील कामगिरी विशेष महत्त्वाची आहे. लखनौ हीच त्यांची कर्मभूमि. तेथेंच त्यांनी आपल्या महत्त्वाकांक्षेला मूर्त स्वरूप आलेलें पाहिलें, नि अखेरीस त्याच स्थानीं आपला पार्थिव देहहि त्यांनी ठेविला !

शास्त्रीय संशोधन हें प्रा. साहनींचें जीवितकार्य होऊन बसलें होतें. अदम्य उत्साह, संशोधनाविषयीं असीम अभिरुचि, आणि वैज्ञानिक समस्या सहजतेनें उकलण्याची हातोटी असा त्रिवेणीसंगम त्यांचे ठायीं झालेला होता. भारतांतील वैज्ञानिक संशोधन पाश्चात्यांच्या तोडीचें, शक्यतर त्याहून वरचढ व्हावें ही त्यांच्या मनाची तळमळ असे. ती त्यांच्या खाजगी संभाषणांतून वारंवार व्यक्त होई. त्यांची विवेचनपद्धति तर्कशुद्ध व सुस्पष्ट असे. रेखीव विचार नि आंखीव योजना हे त्यांच्या संशोधनाचे मोहक पैलू होते. सूक्ष्म निरीक्षण, साधार विधानें आणि सविस्तर सर्वांगीण विवेचन यांमुळें त्यांचें संशोधनात्मक लिखाण फार उच्च प्रतीचें ठरलें आहे. त्यांच्या खिशांत सदैव सज्ज असलेलें सूक्ष्मदर्शक वीक्ष ( lens ) त्यांच्या चिकित्सक वृत्तीची साक्ष देई. अव्याहत परिश्रम ही त्यांची आवड, नव्हे व्यसनच होतें.

प्रा. साहनींजवळ स्वत:चा नानाप्रकारच्या वनस्पतींचा आणि त्यांच्या निखातकांचा ( fossils ) फार मोठा संग्रह होता. आपले गुरु प्रा. कश्यप आणि पत्नी श्रीमती सावित्री साहनी यांच्यासह त्यांनी वनस्पती गोळा करण्यासाठीं हिमालयाच्या कित्येक सफरी केलेल्या होत्या. मध्यप्रदेश, बिहार, आसाम, पंजाब आणि काश्मीरादि प्रदेश निखातक-संपत्तीच्या शोधार्थ त्यांनी अनेकदां पालथे घातले होते. आपल्या संग्रहांतील प्रत्येक वस्तूंवर ते व्यवस्थित टांचणें लिहून ठेवीत. आपला अफाट संग्रह पाहतांना कार्याच्या दृष्टीनें आपलें आयुष्य किती अपुरें आहे याची त्यांना जाणीव होई; नि तसें ते बोलूनहि दाखवीत. अद्ययावत् शास्त्रीय उपकरणांनीं त्यांची प्रयोगशाळा सुसज्ज असे.

## वनस्पतींचा इतिहासकार

प्राध्यापक साहनींनी प्रारंभीं निरनिराळया










विद्यमान वनस्पतींवर संशोधनात्मक लेख लिहिले.[3] परंतु पुढें लवकरच प्रा. सीवर्ड यांच्या परंपरेला अनुसरून त्यांनी निखातक ( fossil ) रूपानें खडकांत आढळणाऱ्या प्राचीन वनस्पतींच्या अवशेषांवर आणि ठशांवरच मुख्यतः आपलें लक्ष केंद्रित केलें. म्हणूनच त्यांना वनस्पतींचा इतिहासकार हें वर्णन यथार्थतेनें लागू पडतें. निखातकरूपी वनस्पतींच्या पद्धतशीर अध्ययनाचा खरा पाया प्रा. साहनींनी घातला. त्यापूर्वी निखातकांचा अभ्यास केवळ कांहीं भूगर्भविषयक समस्या सोडविण्याच्या दृष्टीनें तेवढा भूगर्भवेत्ते करीत असत. परंतु या प्राचीन वनस्पतींच्या रचनेचें सूक्ष्म अध्ययन आणि वनस्पतिमात्रांच्या इतिहासांतील त्यांचें स्थान या दृष्टीनें भारतीय वनस्पतिविशारदांचें लक्ष निखातकांकडे वेधण्याचें सारें श्रेय प्राध्यापक साहनींचें आहे.

वनस्पति-निखातकांच्या रचनात्मक अध्ययनाव्यतिरिक्त त्यांचा ऐतिहासिक क्रम व त्यांची भौगोलिक वांटणी यांचाहि नीट अभ्यास करून प्रा. साहनींनी त्याविषयीं निश्चित आडाखे बसविले. पृथ्वीच्या गतेतिहासांतील हवामानाचीं परिवर्तनें, निरनिराळ्या कालखंडांतील भौगोलिक रचना आणि वनस्पतींचा एकंदर उद्विकास ( evolution ) इत्यादि अनेक प्रश्नांवर त्यांनी आपल्या मूलगामी संशोधनानें नवीन प्रकाश टाकला.

वनस्पतींच्या संशोधनाच्या अनुषंगानें अनेक भूगर्भ-विषयक समस्या सोडविण्यास प्रा. साहनींनी हातभार लावला आहे. उदाहरणार्थ, वॅग्नरचा भूखंडांच्या हालचालीचा सिद्धांत ( Theory of Continental Drift ), गोंडवनभूमीचा ( Gondwana Land ) इतिहास. दक्षिणेंतील अग्निजन्य खडकांचें आयुर्मान. पंजाबांतील मिठाच्या पर्वतराजींच्या निर्मितीचा काळ, हिमालयाची उन्नति ( uplift ) इत्यादि वादग्रस्त प्रश्नांसंबंधीं त्यांनी सबळ पुराव्यानिशीं महत्त्वपूर्ण विचार प्रकट केले आहेत.[4] आपल्या संशोधनांच्या द्वारें भूगर्भशास्त्रज्ञ आणि वनस्पतिविशारद यांना जवळ आणून त्यांच्या सहकार्याची आवश्यकता त्यांनी प्रस्थापित केली. निखातकरूपी वनस्पती हें वनस्पतिशास्त्रावर भूगर्भशास्त्राचें ऋण आहे असें ते म्हणत. आणि त्या निखातकांचा सांगोपांग अभ्यास करून आपण तें ऋण फेडीत आहोंत अशी त्यांची भावना असे.

१९१९ ते १९४९ या कालखंडांत प्रा. साहनींनी अनेक संशोधनात्मक लेख लिहिले आहेत. त्या सर्वांचा नांवनिशीवार सविस्तर उलेख करणें स्थलाभावीं अशक्यच आहे. गोंडवनभूमींतील वनस्पति-निखातकांचा सांगोपांग अभ्यास, 'झायगॉप्टेरिड फर्न्स्' ( Zygopterid Ferns ) नामक प्राचीन वनस्पतींसंबंधींचें क्रान्तिकारी संशोधन, काश्मीरांतील 'कॅरेवाज' नामक प्रदेशांतील वन-

---

3 New Phytologist, 14 ( 4, 5, 8 & 9 ), 15 ( 3 & 4 ); Phil. Trans. Roy. Soc. London 210 ( B ); Ann. Bot. 34 ( 133 ); Jour. Ind. Bot. Soc. 3 ( 7 ); Phil. Trans. Roy. Soc. London 213 ( B ).

4 Proc. 13 th Ind. Sci. Cong. Lahore, 1926; Proc. 5th Int. Bot. Cong. Cambridge, 1930; Proc. 2nd Cong. Stratig. Carb. Heerlen, 1935.; Curren Science, 4 ( 6 ); Proc. 17th Int. Geol. Cong. Moscow, 1937; Kashi Vidyapith Silver Jubilee Commem. Vol., 1947

5 Jour. Ind. Bot. Soc. 15 ( 5 ), Proc. 24th Ind. Sci. Cong. Hyderabad 1937; Nature, 138; Curren Science, 3 ( 4 ); Nature, 153; Current Science, 5.










स्पति-अवशेषांची सुसंगत माहिती, आसाम व पंजाब भागांतील खडकांत आढळणाऱ्या परागकणादि वनस्पतींच्या सूक्ष्म अवशेषांच (micro-flora) सविस्तर वर्णन, इत्यादि त्यांच्या संशोधनाचे कांहीं विषय म्हणून सांगतां येतील. अगदीं आपल्या मृत्यूपूर्वीच त्यांनी 'पेण्टॉक्सिली' (Pentoxyleae) हा नष्ट वनस्पतींचा एक नवीन समुदाय उजेडांत आणला.[६]

भारतांतील वनस्पति-निखातकांच्या संशोधनाचा अहवाल नियमितपणें प्रसिद्ध करण्याची प्रथा त्यांनी सुरू केली. भारतीय विज्ञानपरिषदांच्या अधिवेशन-प्रसंगीं ते त्यावर अधिकारवाणीनें भाष्य करीत. अनेक वादग्रस्त प्रश्नांवर अधिकारी विद्वानांचे परिसंवाद (symposium) त्यांनी घडवून आणले.

प्राध्यापक साहनींच्या वास्तव्यामुळें लखनौ हें निखातकांच्या संशोधनाचें महत्त्वाचें केंद्र बनलें. भारताच्या कोनाकोपऱ्यांतून तेथें विद्यार्थी गोळा होऊं लागले. प्रा. साहनींचीं अखेरचीं सहा-सात वर्षें लखनौ येथें 'इन्स्टिटयूट ऑफ् पॅलिओबॉटनी' वनस्पति– निखातकांच्या अध्ययनाची अखिलभारतीय संस्था– या संस्थेच्या उभारणींत खर्च झाली. या संस्थेस त्यांनीं आपली व्यक्तिगत मालमत्ता आणि आपला प्रचंड ग्रंथसंग्रह अर्पण केला. उच्च प्रतीच्या संशोधनाचें तें आंतरराष्ट्रीय केंद्र व्हावें अशी त्यांची महत्त्वाकांक्षा होती. जून १९४६ मध्यें या संस्थेची स्थापना झाली; आणि ३ एप्रिल १९४९ रोजीं स्वतंत्र भारताचे पंतप्रधान पं. जवाहरलाल नेहरू यांच्या हस्तें तिच्या नवीन इमारतीचा कोनशिला-समारंभ साजरा झालेला प्रा. साहनींनी आपल्या डोळयांनीं पाहिला. परंतु त्या संस्थेचा उत्तरोत्तर उत्कर्ष पाहण्याचें भाग्य त्या महान् शास्त्रज्ञाच्या वांटयाला आलें नाहीं. कारण, त्यानंतर अवघ्या सहा दिवसांनीं त्यांची इहलोकची यात्रा अवचित संपली !

### यशस्वी प्राध्यापक

'प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्' या न्यायानें प्रा. साहनींच्या मार्गदर्शकत्वाखालीं संशोधकांची नवीन पिढी तयार झाली आहे. या शिष्योत्तमांनी आपल्या गुरूची सारी विद्या आत्मसात् करण्याचा प्रयत्न करून भारतांत ठिकठिकाणीं संशोधन-केंद्रें स्थापन केलीं आहेत. या शिष्यवर्गाच्या संशोधनांनींच प्रा. साहनींचें अमर स्मारक उभारलें जाणार आहे.

केवळ पहिल्या प्रतीचे संशोधक म्हणूनच प्रा. साहनींनी कीर्ति मिळविली असें नसून त्यांच्या ठायीं कुशल मार्गदर्शनाचा गुण देखील तितक्याच प्रकर्षानें वास करीत होता. आपल्या सौजन्यपूर्ण प्रेमळ शब्दांनी ते विद्यार्थ्याला उत्साहित करीत. दोन्ही हातांनीं सारख्याच कुशलतेनें फळयावर चित्रें काढीत, वनस्पतिशास्त्रांतील जटिल प्रश्न लीलेनें उकलून दाखवीत, त्यांच्या वाणीचा अस्खलित प्रवाह एकदां सुरू झाला कीं, सारा विद्यार्थीवृंद तन्मय होऊन जाई. प्रा. साहनींच्या विद्वत्तेला शालीनतेची मोहक झालर होती. विद्यार्थ्यांना आपआपल्या संशोधनाचा विषय निवडण्याची ते मोकळीक देत, एकदां निवड झाली कीं त्या विषयाची सांगोपांग माहिती ते करून देत. विद्यार्थ्यांचे संशोधनात्मक प्रबंध ते अगदीं कांटेकोरपणें तपासून पाहत. पुस्तकी ज्ञानापेक्षां प्रात्यक्षिक अनुभवांवर त्यांचा भर असे. प्रा. साहनींचे स्वतःच्या आवडीचे असे कांहीं विषय असले तरी वनस्पतिशास्त्राच्या कोणत्याहि शाखेवर ते सहज बोलूं शकत. इतकें त्यांचें अध्ययन सखोल नि चतुरस्र असे. त्यांच्या व्याख्यानांत नेहमीं अद्य-

6 Ann. Bot. 33 (129), Phil. Trans. Roy. Soc. London, 217 (B), 218 (B); Current Science, 5 (1); Proc. Nat. Acad. Sci. Ind. 14 (6), 16 (2-4), Bot. Gaz. 110 (1).



अनुक्रमणिका






यावत् संशोधनाची दखल घेण्यांत येई. प्राध्यापक साहनींवर त्यांच्या शिष्योत्तमांनी लिहिलेले मृत्युलेख चाळले असतां त्यांत सर्वत्र त्यांच्या अध्यापन–कौशल्याची व सहानुभूतिपूर्ण मार्गदर्शनाची मुक्तकंठानें प्रशंसा केलेली आढळते.

### विलोभनीय व्यक्तित्व

प्राध्यापक साहनींचें एकंदर व्यक्तित्वच मोठें विलोभनीय होतें. त्यांचा साधा परंतु व्यवस्थित व नीटनेटका वेष, त्यांच्या चेहेऱ्यावरचें खेळकर हास्य, त्यांची मनमोकळी वागणूक, संभाषणाची त्यांची मनोवेधक पद्धति, इत्यादि गुणांमुळें ते त्यांच्या हाताखालीं काम करणाऱ्या तरुण संशोधकांच्या गळयांतील ताईत बनले होते. भारतांत आणि परदेशांतहि केवळ शास्त्रज्ञच नव्हे तर इतरहि लोक त्यांच्या व्यवहारांतील अनुपम गोडव्यामुळें त्यांच्याकडे आकृष्ट होत. वनस्पति गोळा करण्यासाठीं सफरी निघाल्या म्हणजे ते आपल्या विद्यार्थ्यांत रंगून जात; आणि अशा वेळी त्यांची परोपकारी वृत्ति व विनोदबुद्धि यांचा विशेष प्रत्यय येई.

प्रा. साहनींना भारतीयत्वाचा फार अभिमान असे. भारतांतील वनस्पतिविशारदांनी वनस्पतिशास्त्रावर प्रमाणभूत ठरतील असे ग्रंथ लिहावे ही त्यांची फार इच्छा होती. तशी योजनाहि त्यांच्या मनांत कित्येक दिवसांपासून घोळत होती. परंतु तिला मूर्तस्वरूप येण्याचें राहून गेलें. स्वसंस्कृतीचा बडेजाव गाण्यांत त्यांनी आपल्या आयुष्याचा एक क्षण दवडला नाहीं तर आपल्या कार्यक्षेत्रांत भारताचें शिर उन्नत होईल असा आमरण प्रयत्न केला.

आपल्या आवडत्या संशोधनाव्यतिरिक्त प्रा. साहनींना इतरहि हौशीचे छंद होते. त्यामुळें त्यांची वृत्ति सदैव उल्हसित असे. आपल्या नानाविध कार्योतून वेळ काढून ते टेनिस व बुद्धिबळें खेळत. मातीचे सांचे करणें नि तिकीटांचा संग्रह या त्यांच्या आवडी होत्या. वनस्पतिसंशोधनांत सदैव गढलेले असले तरी पुराणवस्तुसंशोधनाविषयीं त्यांना रुचि असे. १९४५ सालीं भारतीय नाणक मंडळानें ' नाणीं पाडण्याची प्राचीन भारतीय पद्धति ' या प्रबंधाबद्दल त्यांना ' नेल्सन राईट पदक ' बहाल केलें होतें.

### विद्वान् सर्वत्र पूज्यते

प्राध्यापक साहनींच्या हयातींतच त्यांच्या संशोधन-कार्याचा गौरव शास्त्रीय जगतांत झाला. मानाचीं आणि महत्त्वाचीं कित्येक स्थानें त्यांनी भूषविलीं. भारतीय वनस्पतिशास्त्रमंडळाच्या ( Indian Botanical Society ) संस्थापकांपैकीं ते एक होते. या मण्डळाच्या १९२२ सालच्या अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. १९२१ व १९३८ या दोन वर्षीं भारतीय विज्ञानपरिषदेच्या वनस्पतिशास्त्रविभागाचें अध्यक्षपद त्यांचेकडे होतें. १९२६ सालीं भूगर्भशास्त्रविभागाच्या अध्यक्षपदीं त्यांची निवड झाली. जीवशास्त्रांत महत्त्वपूर्ण संशोधन केल्याबद्दल ' रॉयल एशियाटिक सोसायटी'नें त्यांना बर्कले सुवर्णपदक दिलें. १९४० सालीं भारतीय विज्ञानपरिषदेच्या अध्यक्षस्थानीं त्यांची योजना करण्यांत आली. १९४७ सालीं त्यांना ' सी. आर्. रेड्डी पारितोषका'चा मान मिळाला. १९३२ पासून ते लखनौ विद्यापीठाच्या विज्ञान-विभागाचे प्रमुख होते. पाटणा व अलाहाबाद विद्यापीठांनी त्यांना ' डी. एस्सी.' ही सन्मान्य पदवी देऊन गौरविलें होतें.

### भारताचा प्रतिनिधि

प्राध्यापक साहनींच्या तीस वर्षांच्या निरलस विज्ञानसेवेचा आणि अविरत तपश्चर्येचा भारतेतर जगतांतहि गौरव झाला. १९३० सालीं केंब्रिज येथें व १९३५ सालीं ॲम्स्टरडॅम येथें भरलेल्या आन्तरराष्ट्रीय वनस्पतिशास्त्र परिषदेंत ते निखातक-शाखेचे उपाध्यक्ष होते. १९३५ मध्यें लंडन येथें ब्रिटिश साम्राज्यांतील वनस्पतिविशारदांचें संमेलन भरलें












होतें. त्यांत ते भारताचे प्रतिनिधि म्हणून उपस्थित होते. त्याचवर्षी पॅरिस येथें जीवशास्त्रीय संग्रहालयाच्या त्रिशतसांवत्सरिक महोत्सवांत त्यांनी भाग घेतला होता. लंडनच्या 'रॉयल सोसायटी'चे 'फेलो' (F. R. S.) होण्याचा मान त्यांनी १९३६ मध्यें मिळविला. याच संस्थेच्या विद्यमानें १९४६ मध्यें वैज्ञानिक परिषद बोलावण्यांत आली होती. त्या परिषदेंतहि भारताचें प्रतिनिधित्व प्रा. साहनींकडे होतें. अमेरिकेच्या ॲकेडेमी ऑफ् आर्ट्स् ॲण्ड् सायन्सेस' या संस्थेनें 'परदेशांतील सन्मान्य सभासद' म्हणून त्यांचा गौरव केला. १९४७ सालीं इंग्लंड, युरोप आणि अमेरिका या देशांतील वैज्ञानिक संघटना, उपकरणीं आणि कार्यपद्धति इत्यादींची पाहणी करून भारत सरकारला मार्गदर्शन करण्याच्या हेतूनें शास्त्रज्ञांचें जें मंडळ पाठविण्यांत आलें होतें त्यांत प्राध्यापक साहनींचा समावेश करण्यांत आला होता.

## हा हन्त हन्त...

आतांपर्यंत उल्लेखिलेल्या सर्व मानसन्मानाहून श्रेष्ठ, त्यांच्या कीर्तिमंदिराचें जणुं सुवर्णशिखरच, असा अभूतपूर्व मान प्राध्यापक साहनींना लवकरच प्राप्त झाला. १९५० सालीं स्टॉकहोम येथें भरलेल्या आन्तरराष्ट्रीय वनस्पतिशास्त्रपरिषदेच्या अध्यक्षस्थानीं त्यांची निवड झाली होती. भारतवर्षांतील वैज्ञानिकांना विशेषत: वनस्पतिशास्त्राच्या अभ्यासकांना यापरति अभिमानाची गोष्ट कोणची असणार ? परंतु दुर्दैवानें प्राध्यापक साहनींना, आणि पर्यायानें भारताला, तो मान उपभोगण्याचें नशिबांत नव्हतें ! एप्रिल महिन्याच्या त्या काळरात्रीं, भारतमातेच्या कंठांतील हा अष्टपैलु हिरा निखळून पडला. भारताचा हा विश्वसंमानित सुपुत्र निर्घृण काळानें ओढून नेला !

---

## तुकड्यांचा प्रश्न

"मला पांच कोटी एकर जमीन मिळवावयाची आहे. एवढी मोठी जमीन एकाच्या हातून दुसऱ्याच्या हातांत जात असतां जमिनीचे कदाचित् तुकडे पडतीलहि. पण भूदानांतून निर्माण होणाऱ्या क्रांतीशीं तुलना करतां तुकड्यांबाबतचा हा प्रश्न अगदींच मामुली असून वस्तुतः व्यर्थच म्हटला पाहिजे. मला त्याबद्दल दुःख होत नाहीं. पण मानवी हृदयाचीं होत असलेलीं शकलें मात्र मला व्याकुळ करीत आहेत. तुकडे काय परस्परांची सदिच्छा आणि सहकार्य वाढलें कीं पुन्हां जोडतां येतील; परंतु सामाजिक व आर्थिक विषमतेमुळें दुभंगलेलीं मानवी मनें पुन्हां जोडलीं नाहींत तर आपल्यासारख्या देशांत तरी धोका आहे. आम्ही वस्त्र शिवण्यासाठींच तें कापीत आहोंत... दुसरी गोष्ट अशी कीं, जमिनीचे लहान लहान तुकडे झाल्यानें उत्पादन घटतें ही कल्पनाच मुळांत अनुभवास धरून नाहीं. या विषयावर नियोजन-समितीशींहि माझी चर्चा झाली होती. लहान तुकड्यांत भरपूर मेहनत मशागत केली तर पुरेसें धान्य उपजूं शकतें, माझें म्हणणें त्यांना पटलें."

-- विनोबा

---

## भूदानाचा आशय

"पुष्कळ राजकारणी लोकांची अशी समजूत आहे कीं दूरगामी सामाजिक आणि आर्थिक बदल सत्तेवांचून घडवून आणतां येणार नाहींत... पण हा त्यांचा भ्रम आहे. अंतीं जें साधायचें त्याशीं सुसंगत अशी जर तात्कालिक उपाययोजना नसेल तर मूळच्या साध्याशीं अत्यंत विसंगत अशा ठिकाणीं आपण जाऊन पोंचतों, हें कम्युनिस्ट देशांच्या अनुभवानें दिसून आलें आहे. त्यांच्या प्रक्रियेनें राज्यसत्तेला अधिकाधिक बळ मिळत गेलें आणि ती गळून पडण्याऐवजीं सर्वांना गिळंकृत करणारी अशी झाली. याचकरितां भूदान-आंदोलन असा आग्रह धरतें कीं, जर आपलें ध्येय शासनमुक्त समाजाचें असेल तर आपण आतांच अशी परिस्थिति निर्माण केली पाहिजे कीं ज्यामुळें लोक अधिकाधिक स्वावलंबी बनतील आणि राज्यसत्तेवरील त्यांचें अवलंबन कमी होईल.

भूदानाचा हा जो आशय त्या अर्थानें भूदानाहून अधिक महत्त्वाचें असें दुसरें काम आज नाहीं असें मानून त्याकरितां जीवन अर्पण केलेल्यांनीं इतर कोणतेंहि काम त्यापुढें गौण समजलें पाहिजे."

-- जयप्रकाश नारायण



अनुक्रमणिका








प्रा. भा. कृ. आपटे

# सुएझची समस्या

## इजिप्तचा प्रश्न

इजिप्तच्या प्रश्नानें आज साऱ्या जगाचें स्वास्थ्य पार बिघडवून टाकलें आहे. वातावरणांतला तंगपणा अजूनहि नष्ट झालेला नाहीं. महायुद्धाच्या खाईंत सारें जग ओढलें जातें कीं काय अशी धास्ती निर्माण झाली आहे. पिरॅमिडस् व सुएझ या दोन गोष्टींच्या आधारानेंच इजिप्तची ओळख पटवली जाते. कौतुकाचा विषय असलेल्या या गोष्टींशीं भीतीची भावना आतां संलग्न झाली आहे. पाश्चिमात्य बड्या राष्ट्रांचें वर्चस्व एका रात्रींत झुगारून देणाऱ्या कर्नल नासर यांच्या कृतींत व ब्रिटिश व फ्रेंच साम्राज्य ह्यांच्या डावपेचांत ह्या प्रश्नाचीं बीजें शोधलीं पाहिजेत. हा इतिहास सूक्ष्मपणानें पाहणें फारच मनोरंजक आहे. शंभर वर्षांपूर्वी सुएझ कालव्याची योजना सिद्ध होत असतांना सारें जग तिच्याकडे आश्चर्यानें पाहात होतें. विज्ञानाचें सामर्थ्य व कल्पनेचा विलास यांचें वेधक मिश्रण त्यांत झालें होतें. एकशे तीन मैल लांबीचा, वाळवंटांतून जाणारा व भूमध्य समुद्र आणि तांबडा समुद्र यांचें पाणी एक करणारा कालवा, ही कल्पना जगाला थक्क करून सोडणारी होती. ती हातीं घेणाऱ्या स्थापत्यशास्त्रज्ञाला वेड्यांत काढणारी माणसेंहि निघालीं. परंतु फ्रेंचांनी फार दूरवर विचार करून ही कल्पना पुरस्कारली आणि तिच्यांतूनच आजचा स्फोट निर्माण झाला आहे.

ह्या वर्षाच्या २६ जुलैला कर्नल नासर यांनी सुएझ कालवा कंपनीचें राष्ट्रीयकरण केल्याचें घोषित करून दुसऱ्या महायुद्धांत आधीच खिळखिळया झालेल्या ब्रिटिश आणि फ्रेंच साम्राज्यशाह्यांना एक जबरदस्त तडाखा दिला. त्यांच्यापुढें एकदम जीवन-मरणाची समस्या निर्माण झाली. आणि तिच्यांतून पुढें युद्ध उद्भवलें. या गुंतागुंतीच्या प्रश्नाचा उलगडा कालव्याच्या पूर्वपीठिकेकडे दृष्टिक्षेप केल्यास सहज ध्यानांत येईल.

## थोडासा पूर्वेतिहास

तांबडा समुद्र आणि भूमध्य समुद्र यांना जोडण्याची कल्पना मिसर देशाच्या फॅरोंनीं ( राजांनी ) इ. स. पूर्व १३०० त कृतींत आणली होती. नाईल नदीला फाटा फोडून तो तांबड्या समुद्राला जोडला होता. त्यामुळें तांबड्या समुद्रांतून नाईलच्या द्वारें भूमध्य समुद्रांत जहाजें विनायासानें जात. हा नाईलचा फाटा किंवा कालवा इ. स. ८०० पर्यंत वापरांत होता. कालान्तरानें तो लुप्त झाला. पुढें सोळाव्या शतकांत जुना जलमार्ग खोदून काढण्याचा किंवा नवीन बनविण्याचा आराखडा कांहीं कल्पक स्थापत्यशास्त्रज्ञांनी तयार केला. पण तो केवळ कागदावरच राहिला.

## कालवा खोदण्याची कल्पना

एकोणीसाव्या शतकांत ह्या कालव्याच्या कल्पनेनें पुनः मूळ धरण्यास सुरुवात केली. फ्रान्सचा एक स्थापत्यशास्त्रज्ञ फर्डिनांड द लेसेप्स् हा अलेक्झांड्रिया येथें नोकरीस होता. त्याच्या डोक्यांत कालवा खोदण्याची कल्पना बरेंच दिवस घोळत होती. तत्कालीन इजिप्तचा खेदीव सैदपाशा ह्याच्याशीं त्याची चांगली मैत्री होती. लेसेप्सनें कालव्याकरितां लागणाऱ्या सर्व सवलती खेदीव कडून मिळविल्या. सुएझ कालवा कंपनीची मुहूर्तमेढ रोंवली गेली. कालवा वाहू लागल्यापासून कंपनीनें तो ९९ वर्षेपर्यंत चाल-








यावा असा करार करण्यांत आला. इजिप्तचा खेदीव त्यावेळीं तुर्की सुलतानाचा मांडलिक असल्यामुळें त्याची अनुमति ह्या बनावाला मिळवावी लागली. लेसेपसूच्या भगीरथ प्रयत्नाला सुरुवात झाली.

कालवा खोदण्यास १८५९ च्या वसंत ऋतूंत प्रारंभ झाला आणि १० वर्षांत तें काम पूर्ण झालें. काम चालूं असतांना वेठीवर नेलेले इजिप्तचे हजारो मजूर वाळवंटाची रखरख आणि अवाळ यामुळें मृत्युमुखीं पडले. कालव्याचा उद्‌घाटन-समारंभ १८६९ त मोठ्या आनंदांत थाटामाटानें साजरा झाला. लेसेप्सच्या डोळ्याचें पारणें फिटलें. खेदीवशीं झालेल्या मूळ कराराप्रमाणें सुएझ कालवा कंपनीची मुदत १७-११-१९६८ त संपते.

## इंग्लंडची ठेकेदारी

कालव्याचें काम चालूं असतांना इंग्लंडचे तत्कालीन पंतप्रधान पामर्स्टन यांनी, फ्रेंच साम्राज्य या कालव्याच्या पूर्तीमुळें बलाढ्य होईल या भयानें त्याच्यांत अनेक अडथळे आणण्याचा प्रयत्न केला. वास्तविकपणें कालवा सुरूं झाल्यावर त्यांतून जाणारीं जास्तीत जास्त जहाजें इंग्लंडची होती. इ. स. १८७५ पर्यंत सुएझ कालवा कंपनीचे रोखे मुख्यत: इजिप्त व फ्रान्स यांच्यामध्येंच वाटलेले होते. या वर्षी सुएझ कालवा कंपनीशीं असहकार करण्यांत इंग्लंडनें बावळटपणा केला हें इंग्लंडचें पंतप्रधान डिझरेली यांच्या ध्यानांत आलें आणि त्यांनी संधि साधून आर्थिक अडचणींत असलेल्या खेदीवकडून सुएझ कंपनीचे जवळजवळ निम्मे रोखे स्वस्तांत खरेदी केले. पुढें १८८२ मध्यें खेदीवनें इजिप्तमध्यें अंतर्गत बंडाळी माजली असतांना तिच्यापासून कालव्याला धोका पोंचूं नये म्हणून मदतीस इंग्लंडचे सैन्य बोलावलें. कालव्याचें संरक्षण करण्याची ठेकेदारी इंग्लंडकडे आपोआप चालून आली आणि सुएझ विभागावर त्याची आर्थिक आणि लष्करी पकड कायमची बसली.

ह्यांतूनच इतर राष्ट्रांच्या सहकार्यानें १८८८ चा कॉन्स्टँटिनोपलचा करार निर्माण झाला. ह्या कराराची कांहीं महत्त्वाचीं कलमें ध्यानांत घेणें आवश्यक आहे. कारण ह्या कराराचा नैतिक आधार घेऊन इंग्लंड आणि फ्रान्स हीं राष्ट्रें युद्ध करीत आहेत.

कलम नं. १ अन्वयें कालवा, शांततेच्या काळाप्रमाणें युद्धकाळांतहि सर्व राष्ट्रांच्या जहाजांना खुला राहिला पाहिजे.

कालव्याची नाकेबंदी करण्याचा हक्क कोणत्याहि राष्ट्राला नाहीं.

दुसऱ्या एका कलमाप्रमाणें करारांतील कोणतेंहि राष्ट्र पोर्ट सैद आणि सुएझ येथें कालव्याचें स्वातंत्र्य राखण्याकरितां दोन युद्धनौका ठेऊं शकतें.

कलम नं. १३ मध्यें ह्या करारानें इजिप्तच्या कोणत्याहि हक्कांना बाध येत नाहीं असें म्हटलें आहे. ह्या कलमांचा आधार घेऊन क. नासर इजिप्तचें कालव्यावरचें सार्वभौमत्व प्रस्थापित करूं पहात आहेत. तर ह्या उलट, इतर कलमांकडे बोट दाखवून इजिप्तनें त्यांचा भंग केला म्हणून कालव्याचें स्वातंत्र्य अबाधित राखण्याकरितां लष्करी कारवाई करणें प्राप्त झालें असा दावा इंग्लंड व फ्रान्स यांचा आहे.

## नासरची कारकीर्द

सुएझ कालवा कंपनीची मुदत वास्तवीक १९६८ ला संपावयाची. पण राजकारणाच्या सुंदोपसुंदींत ह्या वर्षाच्या जुलैंतच ती नासरनी संपुष्टांत आणली.

गेल्या चार वर्षांत नासर यांचें राजकारणांतलें यश द्रुतगतीनें शीगेला पोचलें. प्रथम त्यांनी इजिप्तचे राजे फरुक यांना पदच्युत करून रक्तरहित राज्यक्रांतीनें लोकसत्ताक राज्य स्थापन केलें. पुढें स्वतंत्र आणि स्वयंपूर्ण इजिप्त बनविण्याचा ध्यास त्यांनी घेतला. इजिप्तला स्वतंत्र करण्याकरितां सुएझ







विभागांतून इंग्रजी फौज काढून घेण्यास विन्स्टन चर्चिल यांना त्यांनी भाग पाडलें. हिटलरला वाकविणारा चर्चिल कालमाहात्म्य ओळखून नासरला नमला. १८ जून १९५६ ला शेवटच्या इंग्रज सोजिरानें सुएझचा किनारा सोडला.

## आस्वान धरण

इजिप्त इंग्रजांच्या दडपणांतून मुक्त झाल्यावर त्याला आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण करण्याकरितां नासर यांनी आस्वान धरणाची योजना घेतली. इजिप्तचें सारें जीवन नाईलवर अवलंबून आहे. आस्वान धरणाची प्रचंड योजना पूर्ण झाल्यास हजारो एकर रेताड जमिनीचें नंदनवनांत रूपांतर होणार होतें. पण हें सुखस्वप्न सत्यसृष्टींत उतरविण्याकरितां धनिक राष्ट्रांचें साहाय्य हवें होतें. सुएझ कालव्याच्या भौगोलिक आणि राजकीय महत्त्वामुळें आस्वान धरणासारख्या प्रचंड योजनेस इंग्लंड व अमेरिका हीं राष्ट्रें आर्थिक मदत देण्यास तयार होतीं. १७ डिसेंबर १९५५ ला त्यांनी अमेरिकेकडून ५६ दशलक्ष डॉलर्स व जागतिक बॅंकेकडून २०० दशलक्ष डॉलर्स इजिप्तला धरणयोजनेकरितां मिळतील असें अमेरिकेनें जाहीर केलें. फक्त या घोषणेस त्या त्या देशांच्या लोकसभांकडून (Parliament) संमती मिळवावयाची होती. ह्या देणगीमागें राजकारण दडलें होतें हें सर्वांना माहीत होतें. ह्या आर्थिक मदतीच्या घोषणेपूर्वी झेकोस्लोव्हाकियानें इजिप्तशीं त्याला शस्त्रास्त्रें पुरविण्याचा केलेला करार आणि सोविएत रशियानें आस्वान धरणाकरितां देऊं केलेली २०० डॉलर्स मदत, ह्या गोष्टींची दखल अँग्लो-अमेरिकनांस होती. शिवाय इजिप्त, इंग्लंडच्या मध्यपूर्वसंरक्षणयोजनेंत शिरणार नाहीं असें नासर यांनी स्पष्ट केलें होतें. याच सुमारास त्यांनी आपल्याला बगदादकरारांत अडकवून घेण्यास नकार दिला होता.

नासर यांचें स्वातंत्र्यप्रेम आणि महत्त्वाकांक्षा एवढ्यावर थांबली नाहीं. त्यांनी अरबराष्ट्रांचा पुढाकार घेऊन त्यांच्यांत स्वातंत्र्याचें वारें भरून दिलें. त्यामुळें, त्यावेळीं इंग्लंडची जॉर्डनशीं होत असलेली राजकीय बोलणी फिसकटलीं. कम्युनिस्ट चीनला मान्यता द्यावी या त्यांच्या ठरावाचा अरबराष्ट्रांनीं पाठपुरावा केला. येथपर्यंत नासर याच्या राजकारणांतील यशाची कमान एकसारखी झपाट्यानें चढत होती. पण अमेरिका व इंग्लंड यांचा त्यांच्यावरचा विश्वास कमी होत होता. अमेरिकेंतील कपाशीची पैदास करणाऱ्या विभागांतील लोकांना इजिप्तची दोस्ती कधींच नको होती. कारण आस्वान धरणाचें स्वप्न साकार झाल्यास इजिप्तचा लांब धाग्याचा कापूस अमेरिकन कापसास मागें टाकण्याचा बराच संभव होता. अमेरिकेंतील वजनदार ज्यूंना इजिप्तचें व अमेरिकेचें फाटावें असेंच वाटत होतें. त्यांचें चिमुकलें राष्ट्र इस्राएल, व इजिप्त यांच्या विळ्या-भोपळ्याच्या संबंधामुळें ते इजिप्तवर नाराज होते. या घटना घडत असतां वॉशिंग्टनमध्यें रशियानें देऊं केलेल्या आस्वान धरण-योजनेच्या मदतीबद्दल शंका निर्माण झाल्या. रशियन गटांत सामील होण्याचा बागुलबुवा दाखवून नासर अमेरिकेकडून पैसे उपटण्याचा डाव टाकीत आहे असें मत व्यक्त करण्यांत येऊं लागलें. खोल चौकशीअंतीं आस्वान धरणास रशिया पैसे पुरविणें शक्य नाहीं असें समजलें तेव्हां आस्वान धरणयोजनेस अमेरिकन मदतीखेरीज दुसरा मार्ग नाहीं अशी अमेरिकनांची खात्री झाल्यावर, बगदाद-करार व मध्यपूर्व संरक्षण संघ यांशीं असहकार पुकारणाऱ्या व कम्युनिस्ट चीनला मानता द्या अशी भूमिका घेणाऱ्या नासरला 'सीधा' करण्याचें त्यांनीं ठरविलें.

## सुएझ कंपनीचें राष्ट्रीयीकरण

१९ जुलैला इजिप्तचा परराष्ट्रीय वकील, नासर यांनी अमेरिकेची मदत घेण्याचें ठरविलें आहे, असें डल्लेस यांना कळविण्यास गेला. त्याला

अमेरिका आस्वान धरणास मदत देणार नाहीं असें सांगण्यांत आलें. याचवेळीं नासर हे टिटो व पंडित नेहरू यांच्याशी ब्रियोनी येथें बोलणीं करण्यांत गुंतले होते. कैरोला परत आल्यावर त्यांना अमेरिकेचा नवा निर्णय समजला. त्यांचें सारें राजकारण फसलें. अमेरिकेच्या निर्णयामुळें घरांत फजिती व बाहेर हंसें होण्याची पाळी आली. ह्यावर तोडगा म्हणून नासरनीं सुएझ कालवा कंपनीचें राष्ट्रीयीकरण केल्याचें घोषित करून इंग्लंड-अमेरिकेवर मात केली. विशेषत: इंग्लंडच्या पोटांत ह्यामुळें भीतीचा गोळा उठला. मध्यपूर्वेंतून मिळणारें तेल व सुएझमधून चालणारा व्यापार यांवर गदा आली. आर्थिक मदत काढून घेतली असतां नासर मुठींत नाक धरून शरणागती पत्करेल व आपल्या गटांत सामील होईल ही अँग्लो-अमेरिकनांची कल्पना पार फसली आणि त्यांच्यापुढें नवीन पेचप्रसंग निर्माण झाला.

## करारभंगाची हाकाटी

नासर यांच्या घोषणेवर इंग्लंड व अमेरिका येथील वृत्तपत्रांतून त्यांनी १८८८ च्या कान्स्टँटिनोपलचा करार मोडला म्हणून हाकाटी सुरू झाली. राजकारणांत करारभंग करून त्याचा आपल्या सोईप्रमाणें अर्थ लावण्याची प्रथा फार पुरातन आहे. नासर यांनी इस्राएलचीं जहाजें कालव्यांतून जातांना अडवून जसा करारभंग केला तसाच करण्याची पाळी दोस्तराष्ट्रांवर पहिल्या व दुसऱ्या महायुद्धांत आली होती पण त्यांच्या सुदैवानें ती टळली. दुसऱ्या महायुद्धांत इंग्लंडचा पराजय होण्याची वेळ आल्यास सुएझ कालवा उडवून द्यावा अशी आज्ञा विन्स्टन चार्चल यांनींहि दिली होती.

## पेंचप्रसंग सोडविण्याचे प्रयत्न

अनपेक्षितपणें उत्पन्न झालेला कालव्याचा पेचप्रसंग सोडविण्याकरितां इंग्लंड व फ्रान्स यांच्या हालचाली सुरू झाल्या. लंडनला ११ राष्ट्रांची परिषद बोलाविण्यांत आली. तिच्यावर इजिप्तनें बहिष्कार घातला. भारताचे श्री. कृष्ण मेनन यांनी एक मसुदा तयार केला. इजिप्त तो मान्य करण्याची शक्यता होती पण इंग्लंडला तो पसंत नव्हता. पुढें ऑस्ट्रेलियाचे पंतप्रधान रॉबर्ट मेनझिस यांच्या नेतृत्वाखाली ५ राष्ट्रांचें शिष्टमंडळ नासर यांच्याशीं बोलणी करण्याकरितां गेलें. पण समेट घडून आला नाहीं. तदनंतर १५ ऑक्टोबरच्या सुमारास अँग्लो-फ्रचांनी कालवा वापर करणाऱ्या राष्ट्रांचा संघ स्थापन केला आणि त्याला अमेरिकेन आपली संमति दिली. इजिप्तनेंहि आपला मसुदा तयार करून ह्या संघाशीं बोलणीं करण्याची तयारी दर्शविली, ह्या वाटाघाटीच्या मुळाशीं इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका यांचा, इजिप्तनें कालव्याचें आंतरराष्ट्रीय स्वरूप मान्य करून त्याच्या दैनंदिन व्यवहारांतहि आंतरराष्ट्रीय नियमन स्वीकारावें असा महत्त्वाचा मुद्दा होता. ह्या उलट, नासर यांचा, इंग्लंड व फ्रान्स यांनी इजिप्तचें कालव्यावरचें सार्वभौमत्व मान्य करावें व त्याचा नित्याचा व्यवहार इजिप्तकडेच असावा ह्या गोष्टींवर भर होता. अशा ह्या परस्परविरोधी तत्त्वांतून तडजोड निघण्याची शक्यता नव्हती. सुएझ कालवा कोणत्याहि राष्ट्राच्या जहाजास खुला आहे असें ह्यापूर्वीच जाहीर करून नासर यांनी कालव्यावर आपलें सार्वभौमत्व असल्याचें गृहीत धरलें होतें. सुएझ कालवा कंपनीच्या राष्ट्रीयीकरणापासून रोखेदारांचें नुकसान होऊं नये म्हणून पॅरिसच्या वायदेबाजारांत असलेल्या भावाप्रमाणें रोख्यांची किंमत देण्याचें आश्वासन नासर यांनी दिलें. इंग्लंड व अमेरिका यांना विरोधून ते त्यांचा रोष पत्करीत होते पण कायदा आणि नैतिक आधार या दृष्टीनें त्यांची बाजू भक्कम होती.

## बोलणीं फिसकटल्यानंतर

सुएझ कालव्याची बोलणीं फिसकटणार असा रंग दिसत असतांना दि. १९ ऑक्टोबरला जॉर्ड-










नें आपल्यावर इझराएलचें आक्रमण झाल्याची तक्रार केली. लागलीच हा प्रकार इंग्लंड व फ्रान्स यांनी दिलेल्या चिथावणीनेंच इझराएलनें केला असा इशारा मॉस्को रेडिओनें अरब राष्ट्रांस दिला. शिष्टाई सफल होत नाहीं हें पक्कें झाल्यावर इझराएलला दंगा उठवण्यास सांगून कालवा - विभागांत शांतता राखण्याच्या निमित्तानें सैन्य घुसविण्याची कारवाई इंग्लंड व फ्रान्स हीं राष्ट्रें करीत होतीं असें दिसतें. ह्या वेळीं इंग्लंड व फ्रान्स यांच्या झालेल्या गुप्त बैठकी आणि फ्रान्सच्या परराष्ट्रमंत्र्यांनी कांहीं आकस्मिक घटनेमुळें कालव्याच्या प्रश्नास निराळें वळण लागेल म्हणून केलेली सूचना, वरील विधानास पुष्टी देतात.

दि. ३० ऑक्टोबरला इझराएलनें सुएझच्या परिसरांत हल्ला चढविल्याची बातमी येऊन थडकली इजिप्तनें प्रतिहल्ले केले. समेटाची आशा नष्ट होऊन युद्धाला तोंड लागलें. इंग्लंड व फ्रान्स यांनी आंतरराष्ट्रीय जलमार्ग धोक्यांत आल्यामुळ १८८८ च्या कराराप्रमाणें त्याचें संरक्षण करणें आपलें कर्तव्य असल्याचें जाहीर केलें. इजिप्त व इझराएल यांना १२ तासांत युद्धविराम करा नाहींतर कालवा - विभागांतील मोक्याचीं ठिकाणें घेणें भाग पडेल असा निर्वाणीचा खलिता धाडण्यांत आला. युद्धविराम झाला नाहीं, तेव्हां इंग्लंड व फ्रान्स यांनी दि. ३१।१०।१९५६ ला इजिप्तवर चाल केली. पुढें ५ दिवसांत पोर्ट-सैदमध्यें इजिप्तच्या सैन्यानें शरणागतीची भाषा सुरू केली. सत्तेपुढें इजिप्तची बाजू लंगडी पडली.

## गंभीर परिस्थिति

इंग्लंड व फ्रान्स यांच्या आक्रमणाचा सर्वत्र निषेध झाला. त्यांचा मित्र अमेरिका ह्यानें त्यांना युद्ध थांबविण्याची सूचना केली आणि अमेरिकेकडून मिळणाऱ्या युद्धसाहित्याचा उपयोग इजिप्तमध्यें करतां येणार नाहीं असेंहि बजाविण्यास कमी केलें नाहीं. इजिप्तवर हल्ला होण्यापूर्वी ५।६ दिवस पोलंड व हंगेरी येथें सोविएतविरोधी निदर्शनें झालीं. आंतरराष्ट्रीय परिस्थिति गंभीर होत चालल्याचें पाहून संयुक्त राष्ट्रांच्या सुरक्षा मंडळाची तांतडीची बैठक बोलविण्यांत आली. तिच्यांत इंग्लंड व फ्रान्स यांनी ताबडतोब युद्ध थांबवावें असा ठराव मांडला गेला. इंग्लंडनें प्रथमच व्हेटो वापरून तो ठराव हाणून पाडला.

## संयुक्त राष्ट्रांच्या आमसभेची बैठक

ह्याच परिषदेच्या सूचनेप्रमाणें दि. २-११-१९५६ ला संयुक्त राष्ट्रांच्या आमसभेची बैठक झाली आणि तींत इंग्लंड व फ्रान्स यांनी युद्धविराम करावा, सैन्यें मागें घ्यावींत आणि संयुक्त राष्ट्र-संघाच्या सभासदांनी युद्धयमान राष्ट्रांस शस्त्रास्त्रें पुरवूं नयेत असे ठराव पसार करण्यांत आले. पुढें संयुक्त राष्ट्रसंघानें जनरल सेक्रेटरी हॅमरशील्ड यांना कालवा-विभागांत पोलीस बंदोबस्त करण्याकरितां आराखडा तयार करण्याचा अधिकार देण्यांत आला. अमेरिकेनें ह्या ठरावास पाठिंबा दिला. संयुक्त राष्ट्रांच्या सैन्यावर मेजर जनरल बर्न्स यांची नेम-णूक झाली आणि सुएझला जाण्याच्या मार्गावरील टप्पा म्हणून ते नेपल्सला रवाना झाले. इंग्लंड व फ्रान्स यांनी संयुक्त राष्ट्रांच्या सैन्यास प्रथम विरोध दर्शवून पुढें कांहीं अटींवर त्यांनी सुएझ विभागांत यावें असें मान्य केलें. संयुक्तराष्ट्रदल कार्यक्षमतेनें कालव्याचें रक्षण करीत आहे असें दिसून आल्यावर इंग्लंड व फ्रान्स बहुतेक नाताळ-पर्यंत सैन्य काढून घेतील असा रंग दिसतो. मेजर जनरल बर्न्स यांनी युद्धयमान राष्ट्रांमध्यें तळ ठोकून (Buffer State) बफर स्टेट निर्माण केलें आहे. जागतिक युद्धाची भीति सध्यातरी कमी झाली आहे.

ह्या सर्व प्रकरणांत इंग्लंड व फ्रान्स यांनी युद्धांत पदार्पण करून चूक केली असें म्हटलें पाहिजे. ज्या








अरबराष्ट्रांच्या सहकार्यावर त्यांचा तेलपुरवठा अवलंबून आहे त्यांचें वैर पत्करलें, आंतरराष्ट्रीय महत्त्व कमी करून घेतलें आणि घरीं व बाहेर निषेध करून घेतला. रशियाचाहि सुएझ विभागांत चंचुप्रवेश करून घेण्याचा डाव सध्यां हुकला आणि तेवढयापुरता इंग्लंडचा विजय झाला असें समाधान मानण्यास जागा आहे. नासर यांना नैतिक दृष्टया त्यांची बाजू कितीहि मजबूत असली तरी बड्या धेंडांच्या लठ्ठालठ्ठींत राजकारणाचें पाऊल जपून न टाकल्यास लहानग्या राष्ट्राची गठडी कशी वळतें याची पूर्ण कल्पना आली.

युद्धांच्या धामधुमींत अँग्लो फ्रेंचांनी जवळजवळ ६९ जहाजें कालव्यांत बुडविलीं असें तज्ज्ञांचें मत आहे. तीं काढण्यास ६।८ महिनें लागतील. तोंवर वाहतूक सुरू होणार नाहीं.

### मिटतें घेण्याची आवश्यकता

युध्यमान राष्ट्रांत शांतता नांदावयाची असल्यास उभय पक्षांनी कांहीं मुद्द्यांवर पूर्ण विचार करून मिटतें घेतलें पाहिजे.

१ इंग्लंड व फ्रान्स यांनी कालव्यावरची जुनी मालकी सोडली पाहिजे. त्यांनी इजिप्तच्या सार्वभौमत्वाला मान दिला पाहिजे.

२ इजिप्तनें सार्वभौमत्वाच्या ( Sovereignty ) कल्पनेस मुरड घालून आणि कालव्याचें आंतरराष्ट्रीय महत्त्व जाणून, संबंधित राष्ट्रांच्या सहकार्यानें कालव्याच्या दैनंदिन व्यवहाराचा प्रश्न सोडवावा.

३ कालवा सर्व राष्ट्रांना खुला असावा.

४ इजिप्त व अरब राष्ट्रें यांनी १९४८ पासून अस्तित्वांत आलेल्या इस्राएल ह्या ज्यूंच्या राष्ट्रास मान्यता द्यावी.

---

## तुलसीरामायण

ज्या लोकांनीं रामायणें लिहिलीं आहेत, त्यांनींहि आपापल्या आवडीप्रमाणें लिहिलें आहे. आतांच मीं तुलसी-रामायणाचा उल्लेख केला. उत्तर प्रदेशांत व बिहारसारख्या इतर प्रांतांत ज्या घरांतून थोडें बहुत वाचणारा मनुष्य असतो, त्या घरांत तुलसी-रामायण अवश्य असतें. बायबल किंवा कुराण ह्यांच्या प्रती जशा कोट्यवधि विकल्या जातात, आणि प्रत्येक ख्रिस्ती किंवा मुसलमान मनुष्याच्या घरीं त्या आढळतात, तशीच तुलसीरामायणाची स्थिति उत्तर प्रदेशादि प्रांतांत आहे. पण वाल्मीकीनें जसें रामायण लिहिलें तसें तें तुलसीदासांनीं लिहिलें नाहीं. दोहोंत पुष्कळ फरक आहे. उदाहरणार्थ, वाल्मीकि-रामायणांत जी शूद्रवधाची कथा आहे तिचा तुलसीरामायणांत पत्ता नाहीं. कोणा मनुष्याच्या निंदेमुळें किंवा लोकापवादामुळें रामानें सीतेचा त्याग केला, असा तुलसी-रामायणांत कोठेंच उल्लेख नाहीं. तुलशीदासजींचा राम सीतेचा त्याग करीत नाहीं, तो त्याग करूंहि शकत नाहीं. कारण सीता रामाचें एक अंगच आहे. महादेवाबरोबर ज्या प्रमाणें पार्वती जोडलेली आहे, तशीच रामाबरोबर सीताहि जोडलेली आहे. म्हणून रामानें सीतेचा त्याग केल्याची कथा तुलसी-रामायणांत नाहीं किंबहुना राम स्वर्गास गेल्याचाहि उल्लेख केलेला नाहीं. राम आमच्यासाठीं येथें हजरच आहेत, अशी भावना तुलसी रामायणांत निर्माण केली आहे. आणि राम निरंतर जन्म घेत असतात. ज्या ज्या वेळीं आपल्या चित्तांत पवित्र भावनांचा उदय होतो त्या त्या वेळीं रामाचाच जन्म होत असतो. आणि जेथें राम तेथें रामाची भक्ति, म्हणजे सीता असतेच. तुलसीदासानें सीतेला भक्तीच्या रूपांत पाहिलें. तुलसीरामायणांत तर रावण सीतेला घेऊन गेला होता ही घटनासुद्धां नाहीं. तुलसीदासांनीं लिहिलें आहे कीं खरी सीता लपवून ठेवण्यांत आली आणि तिच्याजागीं एक मायावी सीता निर्माण करण्यांत आली, आणि ती रावण घेऊन गेला.

**– विनोबा**








श्री. गं. रा. पटवर्धन

# मतें आणि मतभेद

शॉ आणि चेस्टर्टन यांचें वाङ्मय मी अतिशय आवडीनें वाचलें, आणि त्यांच्या प्रतिभेनें निर्माण केलेल्या विश्वांत विहार करून पुष्कळच शिकलों. पण आतां मला वाटतें कीं या दोन लेखकांतील वादांचा, त्यांच्या प्रकृतिभिन्नत्वाचाच, माझ्यावर अधिक खोल परिणाम झाला. या दोन व्यक्ति आधुनिक काळांतील दोन प्रमुख विचारप्रणालींच्या प्रतिनिधि वाटतात.

चेस्टर्टन म्हणत असे, अहो, समाजसुधारणा, समाजक्रांति म्हणून जें तुम्ही लोक घोकीत असतां त्यांतील 'समाज' पदाचा तुम्हीं कधीं विचार केला आहे कां? समाज हा एक मोठा, विचित्र, जगड्व्याळ प्राणी नाहीं; गोंद्या, हरी, पांड्या यांनीं बनलेला आहे तो. किंबहुना, मनुष्य ही इतर सजीव सृष्टीची 'जात' होऊं शकत नाहीं; प्रत्येक माणूस 'माणूस' असतो. सुधारक वर्ग गोंद्यावर प्रेम करीत नाहीं, 'मानवते' वर करतो. गोंद्याला तो जाणीत नाहीं. 'दलित' वर्गाच्या सुधारणेसाठीं पुस्तकें लिहील व लढाया खेळेल, पण एखादा शेतकरी दिसल्यास त्याला किळस येईल. त्याच्या आशा, त्याचे विचार, बाजूला राहातात आणि उन्नतीच्या मार्गावर त्याला खेंचलें जातें. इच्छा असो वा नसो, त्याचीं पावलें त्या ध्येयाकडे वळविलीं जातात. रुसोनें म्हटल्या-प्रमाणें स्वतंत्र बनण्याचीहि सक्ति केली पाहिजे.

रूढिप्रिय लोकांना असें वाटतें, आणि तें कांहीं चूक मानतां येणार नाहीं. एखादा गरीब माणूस विडी ओढतो, त्याला सांगायचें कीं, खबरदार, तंबाकूनें कॅन्सर होतो; तो विशिष्ट लोकांनाच, विशिष्ट वेळीं, सार्वजनिक आरोग्यखात्याच्या परवानगीनें ओढतां येईल. त्याच्या खोपटांत तो चूल मांडतो; व प्रति-डोई आवश्यक चौरसफूटांहून तें लहान आहे या कारणास्तव तें उध्वस्त केलें जातें. मूल शेंबडें असल्यास गोंजारण्याची मनाई व्हावी. सारांश म्हणजे शॉसारख्या लोकांना घनीभूत, साक्षात्, माणूस रुचत नाहीं; त्यांना काल्पनिक ध्येयाकडे वर मान करून कूच करणारी संख्या दिसते.

पण खरोखर शॉला तसें म्हणायचें नव्हतें; त्याला किळस होती दारिद्र्याची-आणि दारिद्र्यांचीहि. व्यक्ति म्हणून किसान कामगाराला तो जवळ करायला तयार नव्हता, कारण त्याला तें ढोंग वाटत असे. लहान मुलाला देवी झाल्यावर रात्र रात्र जागून त्याच्या खस्ता काढाव्या यांत माया दिसते खरी, पण देवी होऊंच नयेत अशी स्वच्छता व्यवस्थेंत आणली तर? आंधळ्याची काठी म्हणून कुणी जन्म काढला तर तें प्रशंसनीय, पण त्यापेक्षां, शस्त्रक्रियेनें कां होईना, त्याला डोळाच दिला तर?

कांहीं लोकांना इतरांचे श्रम लुबाडण्याची संधि मिळावी आणि अशा श्रीमंतींतून त्यांनीं औदार्याचे पाट वाहवावेत याची सुधारकांना चीड येते. ती दयाबुद्धीच नको, ती माया नको. ज्यांना दिलें जातें ते मिंधे बनतात; जे देतात ते दांभिक. स्वार्थ साधल्यावर मग त्याचा 'त्याग' करणें वाईट; प्रत्येकानें आपापलें नीट भोगावें.

सुधारणावादी लोक अशा रीतीनें न्यायाच्या मूल्यावर भर देतात. त्यामुळें अर्थातच त्यांच्या विचारांना व कल्पनांना एक विशिष्ट घाट येतो. शॉचें वाङ्मय वाचतांना इस्पितळांत वापरून येतो तसा जंतुघ्न औषधाचा सूक्ष्म वास येतो. रूढिप्रिय








लोक प्रेमाचें मूल्य मानतात. आयुष्य हें मर्यादित आहे. पूर्ण सुधारणा उगवणार असेल तेव्हा उगवो; व्यक्तिव्यक्तीचें सुख हें प्रेमावर, स्नेहावर, ममतेवर अवलंबून आहे असा त्यांचा आग्रह आहे. सुधारणेला विरोध नाहीं; ' यानि अस्माकम् सुचरितानि तानि उपास्यानि । नो इतराणि ।' असेंच त्यांचें मत आहे. पण चेस्टर्टन म्हणतो, माणसाची सुधारणा, माणसा-साठीं सुधारणा; सुधारणेसाठीं माणूस नव्हे.

युरोपीय संस्कृतींत वरील दोन प्रवाह खिस्तवादी व मार्क्सवादी असे आतां विभिन्न झाले आहेत. ग्रीकांत देखील जेव्हां प्लेटो एक आदर्श गणराज्य रेखाटत होता तेव्हां Charitas प्रेमपंथी अनेक धर्म प्रचलित होते. खिस्ती धर्माचें मुख्य प्रमेय हेंच आहे कीं विश्व सदोष, अपूर्ण आहे व देवानें त्याची पूर्तता होण्यासाठीं मानवरूपानें जन्म घेतला. खिस्त श्रीमंत लोकांवर कोरडे ओढी व गरीबांची कड घेई, पण ' श्रीमंत ' व ' गरीब ' वर्ग म्हणून नव्हे; तर प्रत्येक माणसाला देवदत्त आत्मा आहे म्हणून. मार्क्सचा तर असा विश्वास होता कीं स्वर्ग हा पृथ्वीवर नांदू शकेल. त्यासाठीं श्रमजीवी लोकांनीं फक्त अन्यायाची शृंखला तोडली पाहिजे.

न्याय व प्रेम या दोन मूल्यांत पदोपदीं फरक आढळतो. अनेकदां कुटुंबसंस्थेचें माहात्म्य स्तवत असतां असें दाखविलें जातें कीं स्त्रीचा ' आई ' म्हणून झालेला आविष्कार इतर सर्व दोषांना झांकून टाकतो. पण खोल विचार केल्यास ही प्रेमानें दोष तोलून धरण्याची पद्धत त्याज्य वाटत नाहीं काय ? दोषहि नको व तें प्रेमहि नको असें म्हणावें काय ? जखम व मलम, चूक व क्षमा, यांची आवश्यकता, यांचें अस्तित्वच वांछनीय नाहीं.

शिवाय प्रेमाचा मार्ग हा न्यायाच्या मार्गाहूनहि खडतर आहे. जेन ऑस्टिनच्या ' मॅन्स्फील्ड ' पार्क नामक एका कादंबरींत एक अर्धश्रीमंत, सुशिक्षित व अभिरुचिसंपन्न तरुणी कांहीं दिवस तिच्या गरीब नातेवाईकांकडे गोंगाट, अस्वच्छता, रोग यांचा अनुभव घेत राहिली, त्याचें फार मार्मिक वर्णन आहे. भाई-भाई म्हणून गळ्यांत गळा टाकणें सोपें आहे पण अंत:करण जडणें व जोडणें दुरापास्त असतें

सुवर्णमध्य गांठूं इच्छिणारे लोक याहि दोन मूल्यांमध्यें, व त्यामागील स्वभाव व शीलांमध्यें सांधे घालण्याचे प्रयत्न करतील. मला एक निराळाच विचार सुचतो. जीवनाच्या सर्वंकष वैचारिका, किंवा जीवनाचीं निरतिशय मूल्यें, यांना डावलूनच सर्व लोक बराच काळ, व बरेच लोक सर्व काळ, जगतात. इतिहास छोट्या गोष्टींनीं व कृतींनीं घडतो. सुदैवानें त्यांत कुठलीच कार्यकारणसंगति दिसत नाहीं. पण यामुळें मतें व मतभेद व्यक्त करण्याचें मात्र थांबवूं नये. मनोरंजक असलें तरी निरुपयोगी आहे म्हणा हवें तर तुम्ही; मी असेंच प्रतिपादणार कीं निरुपयोगी असले तरी मनोरंजक आहेत ते.

---










श्री. म. वि. भिडे

# परलोक संशोधनांतील कांहीं अद्भुत प्रयोग[१]

मनुष्याला मरणोत्तर अस्तित्व असतें किंवा नाहीं या प्रश्नाचा ऊहापोह धर्मांतून व तत्त्वज्ञानामधून प्राचीन कालापासून केलेला आढळतो. कठोपनिषदांत नचिकेताची कथा आहे. तिच्यामध्यें त्यानें यमापाशीं तीन वर मागितले होते. त्यांपैकीं एक वर – " येयं प्रेते विचिकित्सा मनुष्येऽस्तीत्येके नायमस्तीति चैके । एतद्विद्यामनुशिष्टस्त्वयाऽहं वराणामेष वरस्तृतीयः ॥ " असा होता. मनुष्य मेल्यानंतर त्याचें अस्तित्व कायम रहातें असें कांहीं लोक म्हणतात; तर त्याचें उलट तें नष्ट होतें असें दुसरे म्हणतात. तेव्हां ह्याच्या बद्दल मला सत्यज्ञानाचा उपदेश करावा. ह्या प्रश्नाचें " शरीर नष्ट झालें तरी आत्मा कायम रहातो " अशा अर्थाचें उत्तर देऊन त्याबद्दल कठोपनिषदांत चर्चा केलेली आहे. बहुतेक धर्मांनीं मनुष्याचें मरणोत्तर अस्तित्व मानलेलें आहे. पण त्याबद्दल त्यांच्या शिकवणुकीमध्यें महत्त्वाचे फरक आहेत. उदाहरणार्थ, हिंदूधर्माप्रमाणें कांहीं धर्म मरणानंतर मनुष्याला स्वकर्माप्रमाणें इह लोकीं पुनर्जन्म घ्यावा लागतो असें मानतात. तर ख्रिस्तीधर्माप्रमाणें कांहीं धर्म परमेश्वर मनुष्याचे कर्मानुसार त्याला चांगली किंवा वाईट गति एकदमच देतो असें मानतात. सामान्यत: लहानपणीं मनुष्याला त्याचीं मातापितरें आपले धर्माचें शिक्षण देतात; व प्राय: त्याच धर्मावर श्रद्धा ठेवून तो आचरण करीत रहातो. परंतु इतर धर्मांच्या निराळया शिकवणुकीकडे त्याचें लक्ष गेलें म्हणजे कोणत्या धर्माची शिकवणूक खरी मानावयाची असा साहजिकच प्रश्न उद्भवतो व त्याचें मन साशंक होतें.

### परलोक संशोधनाचा प्रारंभ

सतराव्या शतकापासून भौतिक शास्त्रांत झपाट्यानें प्रगति झालेली आहे. व त्यामुळें धर्मांमधून सांगितलेल्या कांहीं कांहीं गोष्टी चुकीच्या आहेत असें स्पष्ट दिसून आलें आहे. उदाहरणार्थ, पृथ्वी सपाट नसून गोल आकाराची आहे; सूर्य तिच्या भोंवतीं फिरत नसून तीच आपल्या भोंवतीं व सूर्याभोंवतीं नित्य फिरत असते, वगैरे– अशाप्रकारचे शोधामुळें धर्मग्रंथांतील सिद्धांताबद्दल अधिकच संशय उत्पन्न झाला. कारण कांहीं गोष्टी खोट्या ठरल्या तर इतर तरी खऱ्या असतील किंवा नाहीं असा साहजिकच संशय उत्पन्न होतो. भौतिक शास्त्रांचे प्रगतीमुळें बुद्धिवादाला प्राधान्य येऊन धर्मांवरील श्रद्धा कमी होत जाऊन नास्तिकवाद व अज्ञेयवाद ह्यांचा झपाट्यानें प्रसार होऊं लागला. अशा स्थितींत सुमारें शंभर वर्षांपूर्वी परलोकसंशोधनास प्रारंभ झाला. अमेरिकेंत फॉक्स नांवाचें एक कुटुंब एका खेड्यामध्यें, भुताटकीचे प्रकार होत असलेल्या एका घरांत, रहात असे. तेथें

---

१ परलोक संशोधनावर प्रस्तुत लेखकानें ' नवभारत 'चे जुलैचे अंकांत एक लेख प्रसिद्ध केला होता. त्यावर एका बुद्धिवादी लेखकानें ' आपली बुद्धिवादी परंपरा ' ह्या शीर्षकाखालीं 'नवभारत'चे सप्टेंबरचे अंकांत प्रसिद्ध झालेल्या आपल्या लेखांत टीका केलेली आहे. जुलैचे अंकांतील लेखांतील कांहीं विषयांचा उल्लेख प्रस्तुत लेखांतहि आला आहे. तेव्हां त्या विषयांसंबंधीं योग्य स्थळीं टीपा देऊन प्रस्तुत लेखकाची भूमिका स्पष्ट केली आहे. वरील टीकाकाराचा उल्लेख पुढील टीकांतून ' बुद्धीवादी ' म्हणून केला आहे.



अनुक्रमणिका






कांहीं प्रयोग केले गेले. त्यावरून भुतांशीं म्हणजे मृतात्म्यांशीं कांहीं विशिष्ट पद्धतीनें संवाद करतां येतो असें दिसून आलें. त्या घरांत दारावर, घडवंचीवर वगैरे ठोके पडत असत. तेव्हां प्रत्येक अक्षराला कांहीं ठोके ठरवून ते भुताला समजाऊन देऊन प्रयोग केले. विचारलेल्या प्रश्नाला भुताकडून सुसंबद्ध उत्तरें मिळालीं व भुतानें स्वतःसंबंधीं सविस्तर माहिती दिली. त्या घरांत एका माणसाचा खून झालेला होता; त्याचें तें भूत होतें. त्यानें स्वतःचे खुनाबद्दल जी माहिती सांगितली तिचेबद्दल शोध करतां योग्य पुरावा मिळून ती सर्व खरी ठरली.

ह्या प्रयोगामुळें मनुष्याचें मरणोत्तर अस्तित्व असतें ह्याला चांगला पुरावा मिळतो असें दिसून आलें. व अशा प्रकारचे प्रयोग अनेक ठिकाणीं होऊं लागले. त्यांपैकीं पुष्कळ यशस्वी झाले.

### " मीडियम् " चा अर्थ

असे प्रयोग करतांना असें दिसून आलें कीं, कांहीं माणसांमध्यें ह्या प्रयोगांना उपयोगी अशी एक प्रकारची शक्ति असते. व अशा माणसांकडून प्रयोग केले म्हणजे ते बहुधां यशस्वी होतात. अशा माणसांना ' मीडियम् ' ( Medium ) म्हणजे ' मध्यस्थ ' किंवा ' हस्तक ' अशी संज्ञा दिली गेली. अशा तऱ्हेची शक्ति असलेल्या माणसाचे मदतीनें प्रयोग केले म्हणजे मृतात्मे त्यांचे मार्फत कागदावर प्रश्नांचीं उत्तरें लिहून कळवूं शकतात असें दिसलें. अशा प्रयोगांमध्यें ' हस्तकां'चे हातांत पेन्सिल दिलेली असते. व प्रश्न विचारले म्हणजे हस्तकानें कांहीं प्रयत्न न करतां त्याचे हातास आपोआप गति मिळून पेन्सिलीनें प्रश्नाचीं उत्तरें कागदावर लिहिलीं जातात. पण कांहीं वेळां हस्ताक्षर स्पष्ट येत नाहीं.

### ' प्लँचेट '

ही अडचण दूर करण्याकरितां ' प्लँचेट ' म्हणून एका साधनाचा उपयोग करतात. प्लँचेट म्हणजे एक लहान त्रिकोणी आकाराची फळी असून तिला खालीं चाकें असतात. हें प्लँचेट हस्तकाचे हातात देतात व तो तें टेबलावर ठेवून त्यावर आपला हात ठेवतो. टेबलावर जवळच एक

२ ' बुद्धिवादी ' लेखकांचें म्हणणे आहे कीं फॉक्स कुटुंबांतील ज्या मुलींनीं हे प्रयोग केले होते त्यांनीं पुढें ते फसवेगिरीचे होते असा कबूलीजबाब दिला होता. पण, त्याबरोबरच ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं त्यानंतर त्या मुलींनीं तो कबूलीजबाब त्यांचेकडून जबरीनें घेतला गेला होता असें सांगून तो परत घेतला होता ! ' मृतात्म्यांशीं संवाद ही कल्पना ख्रिस्ती धर्माचे तत्त्वाशीं विसंगत असल्यामुळें प्रथम पुष्कळ ख्रिस्ती लोकांना ती आवडली नाहीं व त्यांनीं तिला तीव्र विरोध केला ते प्रयोग म्हणजे एक थोतांड आहे असें दाखविण्याचा त्या धर्माचें अभिमान्याकडून जोराचा प्रयत्न झाला. त्यामुळें त्या मुलांनीं सांगितल्याप्रमाणें कबूलीजबाब त्यांचेकडून जबरीनें घेतला असणें संभवनीय दिसलें. कारण, जेव्हां ' फॉक्स ' कुटुंबांत हे प्रयोग झाले तेव्हां ही कल्पना अगदीं नवीन होती. व त्या लहान मुलींनीं असली कल्पना काढून लोकांना फसविण्याचा प्रयत्न केला असेल असें संभवनीय वाटत नाहीं. शिवाय, नुसत्या त्यांचे शब्दावर कोणी विश्वास ठेवला नसता हें उघडच आहे. त्यांना भुतांनी जी हकीकत सांगितली तिचे सत्यतेविषयीं पुरावा मिळाला व पुढें इतरांनीं केलेले तसलेच, पुष्कळ प्रयोग यशस्वी झाले म्हणूनच त्या प्रयोगांकडे लोकांचें विशेष लक्ष गेले. ' परलोक संशोधनां'ची भिस्त ' फॉक्स ' कुटुंबांतील प्रयोगांवर नसून त्यानंतर अनेक लोकांनी अनेक देशांतून तसल्याच प्रकारचे जे लक्षावधि प्रयोग केले व जे यशस्वी झाले व होतात त्यांवर आहे. ' फॉक्स ' कुटुंबांतील प्रयोगांत तर ह्या विषयाला चालना मिळाली एवढ्यापुरतेंच त्या प्रयोगांचें महत्त्व आहे.



अनुक्रमणिका






मुळाक्षरांचा तक्ता ठेवतात. मृतात्म्याला प्रश्न विचारला म्हणजे हस्तकाचे हातांतील प्लँचेटला हस्तकानें कांहीं प्रयत्न न करतां आपोआप गति मिळते. व त्याचें एक टोक इष्ट अक्षरापर्यंत जाऊन तेथें थांबतें. अशा तऱ्हेनें निरनिराळीं अक्षरें दाखविलीं जाऊन व तीं जुळवून त्यांचे शब्द व शब्दांचीं वाक्यें तयार होतात, व अशा प्रकारें मृतात्म्यांना आपलीं उत्तरें सुगम रीतीनें कळवितां येतात. कांहीं प्रयोगांत हस्तकांना मूर्च्छा येते व त्यांचे मार्फत कोणीतरी अदृश्य व्यक्ति बोलते. अशा प्रकारच्या अनेक प्रयोगांवरून मनुष्याचें मरणोत्तर अस्तित्व व त्याची मरणोत्तर स्थिति ह्या विषयीं समाधानकारक पुरावा मिळतो असें दिसून आल्यावरून अशा निरनिराळया पद्धती उपयोगांत आलेल्या आहेत. अमेरिकेंत व युरोपमध्यें पुष्कळ विद्वान् शास्त्रज्ञांचें ह्या प्रयोगांकडे लक्ष वेधलें गेलें. त्यांनीं अशा तऱ्हेचे अनेक प्रयोग निरनिराळया मीडियम्-( हस्तक ) मार्फत अत्यंत काळजीपूर्वक करून त्यांचे सत्यतेबद्दल खात्री करून घेण्याचा प्रयत्न सुरू केला.[3]

## सोसायटी फॉर सायकिकल रिसर्च

इ. स. १८५० च्या सुमारास फ्रान्समध्यें ॲलन् ‘ कारडेक ’ नांवाच्या विद्वान् गृहस्थानें कित्येक वर्षें प्रयोग करून ह्या विषयावर महत्त्वाचीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. इंग्लंडमध्यें सन १८८२ मध्यें ‘ सोसायटी फॉर सायकिकल रिसर्च ’ नांवाची एक संस्था कांहीं सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ व विद्वान् मंडळींनीं स्थापन केली. ह्या सोसायटीचें अध्यक्ष प्रो. हेन्री सिज्‌विक् ( मानसशास्त्र, नीतिशास्त्र, वगैरे विषयांवरील सुप्रसिद्ध ग्रंथांचे कर्ते ) होते. उपाध्यक्ष अर्थर् बॅलफोर् हे होते व सभासदांमध्यें, फ्रेडरिक् मायर्स, गर्ने, वॉलेस्, वगैरे सारखी नामांकित विद्वान् मंडळी होती. ह्या संस्थेचें उद्दिष्ट, टेबलावर ठोके पडणें, कोणी स्पर्श न करतां जड वस्तूंचें स्थलांतर होणें वगैरे जे अद्‌भुत चमत्कार मृत व्यक्तींचे कडून होतात असें समजलें जात होतें त्याबद्दल व इतरहि अतींद्रिय ज्ञानाचे प्रकार म्हणजे टेलिपथी ( Telepathy-विचारसंक्रमण), हिप्नॉटिझम (Hypnotism-मोहनिद्रा), क्लेरव्हॉयन्स ( Clairvoyance-दूरदर्शन ) वगैरेचें शास्त्रशुद्ध पद्धतीनें संशोधन करून त्यांतील सत्य

३ कांहीं ‘ मीडियम्स ’ फसवेगिरी करीत असल्याचें उघडकीस आलें असें ‘ बुद्धिवादी ’ लेखकाचें म्हणणें आहे. पण कांहींनीं फसवेगिरी केली असें मान्य केलें तरी सर्वच ‘ मीडियम्स ’ तसें करीत असतात असें त्यावरून सिद्ध होत नाहीं हें उघडच आहे. येथेंहि हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं गेल्या शंभर वर्षांत परलोकसंशोधनाचें कार्यांत हजारों ‘ मीडियम्स’चा उपयोग केला गेला आहे. त्यामधील पुष्कळ प्रयोग अनेक देशांतील शास्त्रज्ञ व इतर विद्वान् लोकांनीं अत्यंत काळजीपूर्वक चिकित्सक बुद्धीनें केलेले आहेत. त्यांनीं ह्या प्रयोगामध्यें फसवेगिरीला बिलकुल वाव राहूं नये ह्याबद्दल पूर्ण खबरदारी घेतली होती, व ह्या प्रयोगांचे सत्यतेबद्दल पुष्कळ शास्त्रज्ञांची खात्री झाली आहे. अशा तऱ्हेचे प्रयोग फ्रान्समध्यें प्रो. रिशे नांवाच्या सुप्रसिद्ध शास्त्रज्ञानीं ३० वर्षें करून त्यांबद्दल आपल्या ‘ Thirty years of Psychical Research ’ ह्या पुस्तकांत खालील मत प्रदर्शित केलें आहे. “ Cryptesthesia ’ Telekinesis, ectoplasm and premonition seem to me founded on granite,— that is to say on hundreds of rigorous Experiments. The thing is a certainty there is a faculty of cognition that differs radically from the usual sensual faculties. अशाच तऱ्हेचें मत जर्मनींतील प्रसिद्ध शास्त्रज्ञ स्नेक नॉत्‌झिंग ह्यांनीं व कांहीं इतर देशांतील शास्त्रज्ञांनीं स्वतः चिकित्सक पद्धतीनें प्रयोग करून पाहून प्रसिद्ध केलेलें आहे. ”







शोधून काढणें हा होता. त्यावेळीं वरील प्रकारचे अनुभव येत असल्याबद्दल पुष्कळ सत्प्रदर्शनीं विश्वसनीय पुरावा उपलब्ध झालेला होता. अशा स्थितींत त्याचे शास्त्रीय दृष्ट्या संशोधन करून त्यासंबंधीं कांहीं निश्चित सिद्धांत काढणें हे फार अगत्याचें होतें. ही सोसायटी स्थापन झाल्यावर वरील प्रकारचे अनुभवांचे शास्त्रीय दृष्ट्या प्रयोग करून पद्धतशीर संशोधन इंग्लंडमध्यें सुरू झालें व त्या प्रयोगांची हकीकत व त्यावरील शास्त्रज्ञांचें मत सोसायटीचे 'जर्नल' व रिपोर्टांतून प्रसिद्ध होऊं लागलें. अमेरिका व युरोप खंडांतील इतर देशांमधूनहि अशाच प्रकारच्या संस्था निघाल्या व तेथेंहि प्रयोग सुरू झाले. त्यामुळें वरील सर्व प्रकारांसंबंधीं शास्त्रशुद्ध प्रयोगांवरून मिळालेली विश्वसनीय माहिती व त्यासंबंधीं प्रसिद्ध शास्त्रज्ञांचें मत जनतेला उपलब्ध होऊं लागलें. अशा तऱ्हेचे प्रयोग आजतागाईत चालू आहेत. ह्या प्रयोगामध्यें पुष्कळ प्रयोग अत्यंत विस्मयकारक वाटतात. पण त्यांचे सत्यत्वाबद्दल जो संशयातीत असा पुरावा उपलब्ध झाला होता त्यावरून पुष्कळ सुप्रसिद्ध शास्त्रज्ञांची मृतमाणसांचे अस्तित्वाबद्दल व त्यांचेशीं विचारविनिमय करण्याचे शक्यतेबद्दल पूर्ण खात्री झाली. ह्यापैकीं कांहीं अद्‌भुत प्रयोगाबद्दल ह्या लेखांत माहिती देण्याचें योजिलें आहे.

### शास्त्रशुद्ध प्रयोगांची माहिती

शास्त्रशुद्ध पद्धतीनें केलेल्या प्रयोगांमध्यें इंग्लंडमधील रसायनशास्त्रज्ञ सर विल्यम् क्रुक्स् ह्यांनीं प्रथम केलेले प्रयोग सुप्रसिद्ध आहेत. हे प्रयोग सत्यान्वेषणाचे दृष्टीनें कोणत्याहि लबाडीचे प्रकाराला वाव न राहण्याबद्दल पूर्ण खबरदारी घेऊन केले जात. त्यांची सर्व हकीकत सर विल्यम् क्रुक्स ह्यांनीं आपल्या 'Researches in the phenomena of spiritualism' ह्या ग्रंथांत दिलेली आहे. सर विल्यम क्रुक्स ह्यांनीं अनेक प्रयोग डी. डी. होम् व मिस् फ्लॉरेन्स कुक् नांवाच्या दोन चांगल्या हस्तकांमार्फत केले व ते यशस्वी झाले, व त्यांत आलेल्या अनुभवांचे सत्यतेबद्दल त्यांची पूर्ण खात्री झाली. त्यांपैकीं कांहीं प्रयोगांमध्यें 'केटी किंग्' म्हणून एक मृत स्त्रीचें त्यांना सदेह दर्शन 'मिस् फ्लॉरेन्स कुक्' ह्या हस्तक मुलीचे साहाय्यानें प्रयोग चालू असतांना अनेक वेळां झालें. ह्या केटी किंगचें अंगाला स्पर्श करून त्यांनीं तिचें शरीर खरोखरच पूर्णपणें मानवी शरीरासारखेंच आहे अशी खात्री करून घेतली. तिची नाडी तपासून पाहिली व हृदयाचे ठोके मोजले. फोटोग्राफ् पण घेतले. त्या स्त्रीशीं त्यांना बोलतां येत असे व प्रयोगाचे वेळीं हजर असलेल्या इतर व्यक्ती पण तिच्याशीं बोलूं शकत. थोड्या वेळानंतर ती अदृश्य होत असे. व मग 'हस्तक' स्त्री ही शुद्धीवर येत असे. मिस् फ्लॉरेन्स कुक् ही हस्तक स्त्री व केटी किंग ह्या दोघी स्त्रियांचें रूप, उंची, आकार, ह्यामध्यें पुष्कळ फरक होता. तेव्हां केटी किंग ही मिस् कुक् पेक्षां वेगळी व्यक्ति होती ह्याबद्दल संशयास जागा दिसत नव्हती. पण ही व्यक्ति प्रयोगाचे वेळीं कशी उत्पन्न होत असे व पुढें कशी अदृश्य होत असे ह्याचा मात्र नीट उलगडा झालेला नाहीं. हे प्रयोग अंधुकप्रका-

४ सर विल्यम् क्रुक्स् ह्यानां फ्लॉरेन्स कुक् ह्या 'मीडियम्'नें 'बनवलें' असें 'बुद्धिवादी' म्हणतात. ह्या संबंधीं सर विल्यम् क्रुकस् ह्यांचे Researches into the Phenomena of Spiritualism हें पुस्तक मुळांत अवश्य वाचावें म्हणजे त्यांचे प्रयोग शास्त्रीय दृष्ट्या किती चिकित्सक पद्धतीनें व काळजीपूर्वक केले होते व त्यामध्यें फसवेगिरीला वाव राहूं नये म्हणून किती खबरदारी घेतली होती हें स्पष्ट दिसून येईल. फ्लॉरेन्स कुकच्या विश्वासार्हतेविषयीं सर विल्यम् क्रुकस् ह्यांनीं आपल्या पुस्तकांत पृ. १२८ वर अगदीं स्पष्ट व निःसंदिग्ध शब्दांत निर्वाळा दिला आहे.










शांत करावे लागत. अशा प्रयोगांचे वेळीं हस्तकाचे अंगांतून एक चिकट पदार्थ बाहेर येत असल्याचें दिसून आलें. ह्या पदार्थाला इंग्रजींत "एक्टोप्लॅझम" (Ectoplasm) असें नांव दिलेलें आहे. सदेह व्यक्ति अदृश्य झाली म्हणजे तो पदार्थ पुनः हस्तकाचे अंगांत जातो असें आढळून आलें. अशाच तऱ्हेचे मृत माणसांचे सदेह दर्शनाचे इतर शास्त्रज्ञांनीं पण प्रयोग केले. तेव्हांहि अशाच प्रकारचा चिकट पदार्थ हस्तकाचे अंगांतून बाहेर निघत असल्याचें व प्रयोगाचे अखेर पुनः त्याचे अंगांत लुप्त होत असल्याचें दिसून आलें. त्यावरून ह्या 'एक्टोप्लॅझम्-'चे साहाय्यानें मृत माणसांना पुन: मानवी रूप धारण करतां येत असावें असा शास्त्रज्ञांनीं तर्क केलेला आहे. परंतु त्याची पूर्ण प्रक्रिया अजून कोणांस कळलेली नाहीं.

सर विल्यम् क्रुक्स ह्यांनीं जेव्हां आपले प्रयोग सुरू केले तेव्हां पुष्कळ शास्त्रज्ञांनीं त्यांचें स्वागत केलें. त्यांची अशी अपेक्षा होती कीं वरील प्रकारें हस्तकांचे मार्फत होणारे प्रयोगांत कांहींतरी लबाडी असावी व ती सर् विल्यम् क्रुकस्सारखा विद्वान् व चिकित्सक बुद्धीचा शास्त्रज्ञ जरूर उघडकीस आणील. पण सर विल्यम्सूनीं केलेल्या प्रयोगावरून त्यांची जेव्हां त्या प्रयोगाचे सत्यतेबद्दल खात्री झाली तेव्हां वरील शास्त्रज्ञांची निराशा झाली व तेच उलट सर विल्यम् क्रुक्सवर प्रतिकूल टीका करू लागले ! परंतु सर् विल्यम् ह्यांनीं आपलें मत अशा टीकेला न जुमानतां पुनः स्पष्टपणें प्रसिद्ध केलें, व पुढें ५० वर्षांचे आणखी अनुभवानें तर त्यांचें मत अधिकच दृढ झालें. पन्नास वर्षें केलेल्या प्रयोगानंतरचे एका लेखांत ते म्हणतात, " मी जें मत पूर्वी प्रसिद्ध केलें आहे तेंच बरोबर आहे त्याबद्दल माझी पूर्ण खात्री झाली आहे. इहलोक व परलोक ह्यांमध्यें संबंध जोडला गेला आहे ही गोष्ट अगदीं सत्य आहे. "

सर विल्यमस् क्रुकस् ह्यांनीं मृत माणसांचे सदेह दर्शनाचे (materialization) जसे प्रयोग केले, तशाच तऱ्हेचे इतर शास्त्रज्ञांनीं पण इतर हस्तकांमार्फत केले हें वर सांगितलेंच आहे. त्यांनाहि पण तशा तऱ्हेचे अनुभव आले. फ्रान्समधील सर रिचर्ड रिशे, जर्मनींतील श्रेंक नॉट्झिंग, इटलींतील प्रो. बोट्टाझी वगैरे प्रसिद्ध शास्त्रज्ञांनीं मृतात्म्यांचे सदेह दर्शनाचे प्रयोग केलेले आहेत व त्यांचे सत्यतेबद्दल आपलें मत त्यांनीं नमूद करून ठेविलें आहे. मात्र प्रयोगावरून कायकाय गोष्टी निश्चितपणें सिद्ध झाल्या असें मानतां येईल त्याचेबद्दल त्यांचेमध्यें कांहीं बाबतींत मतभेद झालेले आहेत.

## सर ऑलिव्हर लॉज

मृत्यूनंतर माणसाचें अस्तित्व कायम रहात असल्याबद्दल खात्री पटलेले दुसरे इंग्लंडमधील प्रसिद्ध शास्त्रज्ञ म्हणजे पदार्थविज्ञानशास्त्रविशारद सर ऑलिव्हर लॉज् हे होत. ह्यांनीं

---

५ सर ऑलिव्हर् लॉज् ह्यांना 'मार्थ लेराड् ' ह्या मीडियम् 'ने बनविलें असें 'बुद्धिवादी' म्हणतात ! परंतु सर ऑलिव्हर लॉज् ह्यांचे प्रयोग मुख्यत: मिसेस् पायपर व मिसेस् लेनार्ड ह्या मीडियम्स मार्फत केले गेले होते. ह्या दोनहि मीडियम्सनां त्यांचे प्रयोगांत मिळालेल्या यशामुळें फार प्रसिद्धि मिळाली होती. " Fifty years of Psychical Researeh " ह्या ग्रंथाचे कर्ते प्रो. हॅरी प्राइस् ह्यांचे मिसेस् पायपर संबंधीचे त्यांच्या ग्रंथांतील उद्गार पाहिले म्हणजे संशयाला जागा राहूं शकत नाहीं. उलट या प्रयोगामुळेंच इंग्लंड व अमेरिकेंत प्रस्तुतचें संशोधन भक्कम पायावर आधारलें गेलें असें म्हणतां येईल. सर ऑलिव्हर् लॉज् हेहि मोठे नामांकित शास्त्रज्ञ होते व त्यांचे प्रयोगहि अत्यंत काळजीपूर्वक व चिकित्सक पद्धतीनें केले जात असत. हें त्यांचे ग्रंथावरून दिसून येईल. त्यांनीं अनेक वर्षें अशा तऱ्हेचे जे प्रयोग

परलोकसंशोधनामध्यें पुष्कळ लक्ष घातलेलें होतें व प्रयोगहि केलेले होते. सन १९१५ मध्यें पहिल्या महायुद्धांत त्यांचा मुलगा 'रेमंड' हा मृत्युमुखीं पडला व त्याचेकडून त्यांना जे संदेश मिळत गेले त्यावरून रेमंडचे मरणोत्तर अस्तित्वाबद्दल त्यांची पूर्ण खात्री झाली व त्यांचें मनुष्याचे मरणोत्तर अस्तित्वाबद्दलचें मत दृढ झालें. सर ऑलिव्हर लॉज् ह्यांनीं परलोकविद्येसंबंधी अनेक पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यामध्यें आपला पुत्र 'रेमंड' ह्याचे मृत्यूनंतर आलेल्या अनुभवांवर आधारलेलें 'Raymond, or Life after death' हें स्वतंत्र पुस्तक त्यांनीं लिहिलेलें आहे. ह्या पुस्तकाला पुष्कळच प्रसिद्धि मिळाली. पहिल्या युद्धामध्यें पुष्कळ लोकांचे नातलग मृत्युमुखीं पडल्यामुळें त्यांचें लक्ष ह्या विषयाकडे विशेष वेधलें गेलें व परलोक-संशोधनाला अधिक चालना मिळाली.

'रेमंड' हा युद्धामध्यें अचानक मरण पावल्या-मुळें त्याला परलोकांतील परिस्थितीशीं समरस होण्यास कांहीं अवधि लागला. त्यामुळें त्याचे संदेश प्रथम त्रोटक स्वरूपाचे येत होते व त्याला आपले विचार कळविण्यास अडचण पडत होती असें दिसत होतें. परंतु पुढें ती अडचण दूर झाली व रेमंडकडून बारीक सारीक गोष्टीबद्दलहि पुष्कळ प्रश्न विचारले गेले व त्याचेकडून पण पुष्कळ माहिती मिळत गेली. त्यावरून सर ऑलिव्हर लॉज् व त्यांची पत्नी ह्या दोघांनाहि ते सर्व संदेश त्यांचा मृतपुत्र 'रेमंड' ह्याचेकडून येत होते. ह्याबद्दल शंका उरली नाहीं. 'रेमंड' संबंधीं झालेल्या प्रयोगामध्यें रेमंडचे मृत्यूपूर्वी इतर ऑफिसरांचे बरोबर त्याचा एक फोटोग्राफ घेतला होता, त्या संबंधीं सर ऑलिव्हर ह्यांना प्रथमच माहिती मिळाली. पुढें शोध करतां

---

केले व त्यांत जे अनुभव आले व पुढें युद्धांत मृत्यु पावलेला त्यांचा पुत्र 'रेमंड' ह्याचेकडून त्यांना जे संदेश मिळाले त्यामुळें त्यांची मनुष्याचे मरणोत्तर अस्तित्वाबद्दल पूर्ण खात्री झाली.

सर अलिव्हर् लॉज ह्यांना दुसरे एक शास्त्रज्ञ सर रे लँकॅस्टर ह्यांनीं 'Telepathy' प्रयोगानें सिद्ध करून दाखविण्यास आव्हान केलें असतांना सर् ऑलिव्हर लॉजनीं तें आव्हान स्वीकारलें नाहीं असें 'बुद्धिवादी' म्हणतात. परंतु त्याचीं अनेक कारणें असूं शकतील. सर् रे लँकॅस्टर हे किती पूर्वग्रह-दूषित होते ही गोष्ट त्यांना एका कमिटीवर 'Thought Reading' संबंधी परीक्षण करून मत देण्यास नेमलें असतांना त्यांनीं हा विषय खुळचट म्हणून प्रयोग करण्याचें देखील नाकारलें, ह्यावरून दिसून येईल (पहा — Personality of man, by Tyrrell —— पान २३०). शिवाय आणखी ह्या बाबतींत लक्षांत ठेवणें अवश्य आहे, ती ही कीं भौतिक शास्त्रांतील प्रयोगाप्रमाणें 'परलोकसंशोधनां'-तील प्रयोग वाटेल तेव्हां व वाटेल त्या परिस्थितींत होऊं शकत नाहींत. त्यामुळेंच मीडियम्स् वगैरेहि साधारणत: असले प्रयोग आव्हान स्वीकारून निश्चितपणें करून दाखविण्याचे अंगावर घेऊं शकत नाहींत. परंतु त्यामुळें त्यांचे प्रयोग फसवेगिरीचे असले पाहिजेत असें सिद्ध होत नाहीं. गेल्या शंभर वर्षांत अनेक शास्त्रज्ञांनीं अत्यंत चिकित्सक पद्धतीनें काळजीपूर्वक असले प्रयोग केलेले आहेत व त्यांत त्यांनीं फसवे-गिरीला बिलकूल वाव राहूं नये म्हणून पूर्ण खबरदारी घेतली होती. अशा तऱ्हेचे जे प्रयोग यशस्वी झाले आहेत त्यांची शास्त्रीय दृष्ट्या विचार करून उपपत्ति लावणें अगत्याचें आहे. अशाच तऱ्हेनें केलेल्या प्रयोगा-वरून सर् ऑलिव्हर लॉज व इतर कांहीं शास्त्रज्ञांची मनुष्याचे मरणोत्तर अस्तित्वाबद्दल खात्री झाली. दुसऱ्या कांहीं शास्त्रज्ञांची तशी खात्री झालेली नाहीं ही गोष्ट खरी पण त्यासंबंधीं टीप (६) मध्यें विचार केला आहे.










ती माहिती खरी ठरून तो फोटोग्राफ पण सर ऑलिव्हर लॉजना पहावयास मिळाला !

### ' आर-१०१ ' विमानाचा अपघात

१९३० सालीं, ' R-101 ' ह्या नांवाच्या एका ब्रिटिश ' हवाई ' जहाजाला (airship) अपघात होऊन तें पडलें व त्यांतील सर्व माणसें जळून मृत्यू पावलीं. त्यामध्येंच त्या जहाजाचा कमांडर लेफ्टनंट अर्विन पण होता. हा अपघात कशा प्रकारें झाला ह्याची कोणासहि कांहीं माहिती नव्हती. हा अपघात ५ ऑक्टोबर १९३० ह्या ह्या दिवशीं झाला. त्यानंतर दोन दिवसांनीं म्हणजे ७ ऑक्टोबरला प्रो. हॅरी प्राइस् "( Fifty years of Psychical Research " ह्या ग्रंथाचे कर्ते ) ह्यांच्या प्रयोगशाळेमध्यें मिसेस् गॅरेट नांवाच्या हस्तकामार्फत कांहीं प्रयोग चालू होते. त्यावेळीं प्रो. हॅरी प्राइस् हे स्वतः हजर होते. हे प्रयोग चालू असतां मिसेस् गॅरेट ह्यांचा आवाज एकदम बदलला व लेफ्टनंट अर्विननें अपघाताबद्दल सविस्तर हकीगत त्यांचे मुखांतून आपण होऊन सांगितली. तिच्यामध्यें पुष्कळशी माहिती विमानाच्या यंत्रांतील दोष व इतर प्रतिकूल परिस्थितीबद्दलची तांत्रिक स्वरूपाची होती. त्याबद्दल ' हस्तक ' स्त्रीस कांहींहि कल्पना असणें शक्य नव्हतें. पुढें सरकारनें ह्या अपघाताबद्दल चौकशी करण्याकरितां सर जॉन् सायमन् ह्यांचे अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली. त्या कमिटीनें केलेल्या चौकशींत उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून लेफ्टनंट अर्विननें मिसेस् गॅरेट ह्या हस्तकामार्फत दिलेली पुष्कळशी माहिती बरोबर ठरली. लेफ्टनंट अर्विननें सांगितलेली एक गोष्ट अत्यंत गुप्त असून सरकारी अधिकाऱ्यांशिवाय इतर कोणासहि त्याबद्दल माहिती नव्हती.

६. मनुष्याचे मरणानंतर त्याचें अस्तित्व कायम राहतें हें मानण्यास मुख्य आधार म्हणजे वरील लेखांत वर्णन केलेला R-101 हवाई जहाजाचा किंवा तत्सदृश दुसरे प्रयोग होत. त्याच लेखांत पुढें वर्णन केलेले ' Direct Voice 'चे प्रयोग पण त्याच कोटीमध्यें गणिले पाहिजेत.

' बुद्धिवादी ' लेखकांचा मुख्य मुद्दा असा आहे कीं ' मृतात्मे ह्या जगाचे कारभारांत रस ( Interest ) घेतात हें म्हणण्यापूर्वीं शरीरापेक्षां वेगळा असा ' आत्मा ' असूं शकतो हें मान्य केलें पाहिजे आणि ह्याकरितां पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, जीवशास्त्र, प्रायोगिक मानसशास्त्र, ह्या शास्त्रांना आणि तर्कशास्त्राला धाब्यावर बसविलें पाहिजे. दुसरें असें कीं, मृतात्म्याचें अस्तित्व प्रतिपादन करण्याला ज्या घटना पुरावा म्हणून पुढें केल्या जातात त्यांची शास्त्रीय तपासणी व चिकित्सा कोणी केली होती कीं काय हें पाहिलें पाहिजे.

वरील आक्षेपांत भौतिक शास्त्रांशीं एखादी घटना विसंगत दिसली तर ती असत्य असली पाहिजे असें गृहीत धरल्यासारखें दिसतें. परंतु, भौतिक शास्त्रांतील सिद्धांत तरी कोठें त्रिकालाबाधित असतात ? भौतिक शास्त्रांमधील तत्कालीन सिद्धांताप्रमाणें एके वेळीं शास्त्रज्ञांना अशक्य वाटणाऱ्या गोष्टीहि पुढें शक्यच नव्हे तर नित्यपरिचयाच्या झाल्या आहेत. उदाहरणार्थ, विमानविद्या, टेलिफोन, ग्रामोफोन, बिनतारी संदेश, क्ष-किरण, अणुविच्छेद, वगैरे. ' टेलिफोन'चे शोधाबद्दल प्रथम एडिनबरोचे प्रो. टेट् ह्यांनीं ऐकलें तेव्हां त्यांनीं अशी घटना शास्त्रदृष्ट्या केवळ अशक्य आहे असे उद्गार काढले ! एडिसनचा फोनोग्राफ् प्रथम पॅरिसचे सायन्सचे ॲकॅडमीपुढें ठेवला तेव्हां त्या शास्त्रज्ञांना त्यांत कांहीं तरी फसवेगिरी असलीच पाहिजे असें वाटलें ( पहा. ' Personality of man ' - by Tyrrell पान २६० ) तात्पर्य, भौतिक शास्त्रांतील ज्ञान पण अपूर्ण असून त्यांत नित्य नव्या ज्ञानाची भर पडत आहे व त्यामुळें पूर्वीचे सिद्धांत पुष्कळवेळा चुकीचे ठरलेले आहेत ही गोष्ट नेहमी लक्षांत ठेवली पाहिजे.







ह्या प्रयोगाची उपपत्ति मनुष्याचे मरणोत्तर कांहीं काळपर्यंत तरी अस्तित्व मानल्याशिवाय लागत नाहीं व त्यामुळें हा प्रयोग तशा अस्तित्वाचा उत्कृष्ट पुरावा समजला जातो.

**आर्थर फिंडले : तीन महत्त्वाचे प्रयोग**

इंग्लंडमधील परलोकसंशोधन करणाऱ्या अनेक संस्थांचे अध्यक्ष व उपाध्यक्ष झालेले आर्थर फिंडले ह्या नांवाचे गृहस्थांनीं १२ वर्षें 'स्लोत' नांवाचे हस्तकाचे मार्फत प्रयोग करून त्यांची हकीकत आपल्या 'On the Edge of the Etheric' ह्या ग्रंथांत दिली आहे. ह्या ग्रंथाची इंग्लंडमध्यें फार प्रसिद्धि झाली व त्याच्या १९३१ पासून १९४५ पर्यंत ४१ आवृत्त्या निघाल्या ! इतर भाषांतून पण त्याचीं भाषांतरें झालीं आहेत. स्लोतचे मार्फत केलेल्या

'मृतात्म्यांशीं संवाद' हा एक अगदीं निराळ्या कोटींतील प्रयोग आहे. ह्याचा संबंध मुख्यत: मनाशीं व आपल्या भोंवतीं असणाऱ्या अदृश्य सृष्टींशीं येतो. आजचें मानसशास्त्र बाल्यावस्थेंत असून मनाचें स्वरूप व प्रक्रिया ह्यांचेबद्दल अजून पुष्कळ गोष्टींचा उलगडा झालेला नाहीं. आपल्या इंद्रियांची शक्ति मर्यादित असून त्या शक्तीचे पलीकडे अदृश्य सृष्टि आहे हें भौतिक शास्त्रांतील प्रयोगांवरूनहि दिसून आलेलें आहे. उदाहरणार्थ मायक्रास्कोप, टेलिस्कोप वगैरे सारख्या साधनांनीं आपल्या इंद्रियांना अदृश्य अशा पुष्कळ गोष्टींचें आतां ज्ञान झालेलें आहे. तात्पर्य, कोणतीहि घटना केवळ आजचे भौतिक शास्त्रांतील ज्ञानाशीं विसंगत दिसली म्हणून ती असत्य असली पाहिजे असें म्हणणें समंजसपणाचें होणार नाहीं.

ज्या प्रयोगावरून मनुष्याचें मरणोत्तर अस्तित्व कायम राहतें असें समजलें जातें ते प्रयोग शास्त्रीय रीत्या, चिकित्सक बुद्धीनें, व कपटाला कांहीं वाव राहूं नये अशा पद्धतीनें केले पाहिजेत ह्या-बद्दल वाद नाहीं. पण सर विल्यम् क्रुकस्, सर आलिव्हर लॉज, प्रो. हॅरी प्राइस, आर्थर फिंडले वगैरे ज्या विद्वान् गृहस्थांनीं केलेल्या ज्या प्रयोगांचें वर्णन वरील लेखांत आलेलें आहे ते सर्व प्रयोग अशाच प्रकारें केलेले होते व त्यामुळेंच ज्यांनीं ते प्रयोग केले त्यांची त्या प्रयोगांचे सत्यतेबद्दल खात्री झाली.

परलोकसंशोधनांत ज्यांनीं स्वत: पुष्कळ कार्य केलें होतें अशा कांहीं विद्वान् गृहस्थांनीं आपले मृत्यूनंतर आपलें अस्तित्व कायम राहिलें तर त्याची जाणीव इष्टमित्रांना संदेश पाठवून करून देऊं असें सांगून ठेवलें होतें व त्याप्रमाणें त्यांनीं संदेश पाठवून आपलें अस्तित्व इष्टमित्रांना पटवून देण्याचा प्रयत्न केला. अशा तऱ्हेचे संदेश सर हेन्री सिजविक्, फ्रेडरिक् मायर्स, गर्नी, वगैरे विद्वान् गृहस्थांनीं आपले मृत्यूनंतर पाठविले. त्यांचा वृत्तांत पण मनुष्याचे मरणोत्तर अस्तित्वाबद्दल पुरावा म्हणून महत्त्वाचा व उद्बोधक आहे. ( पहा. Psychical Research by W. F. Barret, Chapter XV—Automatic writing and cross Correspondence).

कांहीं शास्त्रज्ञांनीं वरील प्रकारचे प्रयोगावरून मनुष्याचें मरणोत्तर अस्तित्व सिद्ध झालें आहे असें मानलें आहे; पण इतरांनीं मानलेलें नाहीं. ज्यानीं तें मानलेलें नाहीं त्यांपैकी पुष्कळांचा दृष्टिकोण कसा पूर्वग्रहदूषित आहे हें 'टिरेल' ह्यानीं आपल्या 'Personality of man' ह्या पुस्तकांत स्पष्टपणें दाखविलें आहे ( ह्या पुस्तकांतील प्रकरण ९ भाग २६ ते २९ पहावे ). प्रो. रिशे सारख्या कांहीं शास्त्रज्ञांची टीप नं. ३ मध्यें सांगितल्याप्रमाणें प्रयोगांचे सत्यतेबद्दल पूर्ण खात्री झाली आहे. पण ते त्यांची उपपत्ति 'विचारसंक्रमण' किंवा अशाच अन्य प्रकारें लावण्याचा प्रयत्न करतात. पण वरील लेखांत दाखविल्याप्रमाणें तशी उपपत्ति समाधानकारक रीतीनें लागत नाहीं व एकंदरीनें विचार करतां सर विल्यम क्रुकस्, सर आलिव्हर लॉज्, सर विल्यम् बॅरेट वगैरेंनीं मान्य केलेली मनुष्याचे मरणोत्तर अस्तित्वाची उपपत्तिच ग्राह्य वाटते.












प्रयोगांवरून आर्थर फिंडले ह्यांची मरणोत्तर मनुष्याचें अस्तित्व व व्यक्तिमत्व कायम राहतें ह्याबद्दल पूर्ण खात्री झाल्याबद्दल त्यांनीं वरील ग्रंथांत नमूद केलेलें आहे. त्यांनीं कांहीं प्रयोगांची सविस्तर माहिती दिलेली आहे व त्यामध्यें मनुष्याचें मरणोत्तर अस्तित्व सिद्ध करणारे तीन प्रयोग प्रथमश्रेणीचे व सर्वोत्तम म्हणून दिलेले आहेत. त्या प्रयोगांची हकीगत थोडक्यांत खालील प्रमाणें आहे.

प्रयोगांची माहिती देण्यापूर्वी एक गोष्ट येथें प्रथम सांगणें जरूर आहे. 'स्लोत' ह्या हस्तकाचे मार्फत केलेल्या प्रयोगांचें एक मोठें वैशिष्टय हें होतें कीं त्यांमध्यें मृत माणसें आपलें पूर्वीचे म्हणजे इहलोकावस्थेंतील आवाजानें ( Direct Voice ) बोलूं शकत व त्यामुळें त्यांना ओळखण्यास त्यांचा आवाज हा उत्कृष्ट पुरावा मिळत असे. हे प्रयोग, बहुशः अंधारांत किंवा फारतर तांबडया अंधुक प्रकाशांत केले जात असत. कारण, ते पूर्वी उल्लेख केलेल्या ( Ectoptasm ) ह्या द्रव्याचे साहाय्यानें केले जात, व त्याला साधा प्रकाश अपायकारक असतो. ह्या द्रव्यांत अदृश्य सृष्टींतील कांहीं द्रव्य मिसळून त्याचा एक मुखवटा अदृश्य सृष्टींतील तज्ज्ञ माणसें करतात व तो मुखवटा आपल्या सूक्ष्मदेहांतील मुखावर बसवला म्हणजे मृत माणसांना इह लोकांतील पूर्वीचें आवाजानें थोडा वेळ बोलतां येतें, अशी माहिती मृत व्यक्तीकडूनच असल्या प्रयोगांमध्यें मिळाल्याबद्दल वरील ग्रंथांत सांगितलें आहे. ह्या प्रयोगांचे वेळीं बोलण्यास मदत व्हावी म्हणून 'कर्णे' ( trumpets ) ठेवलेले असत. ज्या माणसाशीं बोलावयाचें असेल त्याला मृत माणसें त्या कर्ण्यांनीं स्पर्श करून सूचना देत व मग त्याच्याशीं कर्ण्यांमधून बोलत. क्वचित प्रसंगीं तांबड्या प्रकाशाच्या किरणांचे साहाय्यानें बोलणारांचा तोंडावळा पण दृष्टीस पडूं शकत असे. अशा प्रकारचे प्रथम प्रयोग केले तेव्हां आर्थर फिंडले ह्यांच्याशीं त्यांचा मृत पिता बोलला. त्यामुळें त्यांची ह्या प्रयोगाचे सत्यतेबद्दल खात्री झाली व हे प्रयोग चालू ठेवण्यास त्यांना उत्तेजन मिळालें.

वर निर्दिष्ट केलेल्या तीन प्रथमश्रेणीचे प्रयोगांपैकीं पहिला प्रयोग आर्थर फिंडले ह्यांच्या भावाचे संबंधीचा आहे. हा भाऊ नुकताच सैन्यामधून सेवामुक्त केलेला होता. त्याला आर्थर फिंडले ह्यांनीं एका प्रयोगाचे वेळीं सहज आपल्याबरोबर नेलें होतें. हस्तक 'स्लोत' किंवा प्रयोगाचे वेळीं उपस्थित असलेल्या मंडळींना त्या गृहस्थाची कांहीं माहिती नव्हती. प्रयोग सुरू झाल्यावर एक अदृश्य व्यक्ति त्यांचेजवळ अचानक येऊन बोलूं लागली. ओळख न पटल्यामुळें त्यांनीं बोलणारा कोण म्हणून प्रश्न विचारला. तेव्हां त्यानें 'एरिक सॉंडर्स' असें आपलें नांव सांगितलें. ह्या नांवाचा कोणी ओळखीचा मनुष्य आर्थर फिंडले ह्यांचे भावाला प्रथम आठवेना;

---

'मृतात्म्यांशीं संवाद' ही घटना नुसती तर्कावर आधारलेली नसून प्रयोगांवर आधारलेली आहे. हे प्रयोग कोणालाहि करतां येण्यासारखे आहेत. मात्र ते योग्य पद्धतीनें व योग्य साधनांनी केले पाहिजेत. त्याविषयी हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं अशा तऱ्हेचा प्रत्येक प्रयोग यशस्वी होतोच असें नाहीं. ह्या प्रयोगांत अदृश्य सृष्टीशीं संबंध येतो व सर्व परिस्थिति अनुकूल असावी लागते. योग्य पद्धतीनें प्रयोग केले म्हणजे पुष्कळ यशस्वी होतात, असा अनुभव आहे. तेव्हां केवळ शास्त्रज्ञांनीं केलेल्या प्रयोगांवरच अवलंबून राहण्याची आवश्यकता नाहीं. युरोप व अमेरिकेमध्यें पुष्कळ लोक 'Family Circles' करून इष्ट मित्रांसमवेत असले प्रयोग करीत असतात व त्यांतले पुष्कळ यशस्वी होत असल्यामुळें तिकडे असल्या प्रयोगांचा पुष्कळ प्रचार झालेला आहे. हिंदुस्थानांत अद्याप तसा प्रचार झालेला नाहीं. तथापि, महाराष्ट्रांत श्री. ऋषि ह्यांनी ह्या शास्त्राचा पुष्कळ वर्षें अभ्यास केलेला आहे.










म्हणून त्यांनीं त्यासंबंधी आणखी पुष्कळ प्रश्न विचारले. तेव्हां एरिक सॉंडर्सनें असें सांगितलें कीं सैन्यामध्यें असतांना फिंडले ह्यांचेकडे सैनिकांना बंदुकीचें शिक्षण देण्याचें काम होतें, तेव्हां तो त्या सैनिकांच्या एका तुकडींत होता. ओळख पटण्याकरितां त्यानें अनेक गोष्टी सांगितल्या. त्यावरून फिंडले ह्यांना सॉंडर्सनें सांगितलेल्या हकीगतीचे सत्यतेबद्दल खात्री झाली. पुढें त्यांनीं लष्करांतील कागदपत्र ( रेकॉर्डस् ) पाहूनहि कांहीं गोष्टीबद्दल माहिती मिळविली. व त्या माहितीवरूनहि सॉंडर्सनें सांगितलेल्या हकीगतीला दुजोरा मिळाला.

ह्या प्रयोगांमध्यें लक्षांत ठेवण्यासारखी मुख्य गोष्ट ही कीं ' एरिक् सॉंडर्स ' सारखे अनेक सैनिकांना फिंडले ह्यांनीं शिक्षण दिलेलें असल्यामुळें त्यांना त्यांचें स्मरणहि राहिलेलें नव्हतें व त्यांचे किंवा उपस्थित असलेल्या कोणत्याहि व्यक्तीचे मनांत सॉंडर्स संबंधीं कांहीं विचार असणें शक्य नव्हतें. तेव्हां उपस्थित असलेल्या लोकांचे मनांतील विचारांचें संक्रमणानें ( Telepathy ) असल्या प्रयोगांची उपपत्ति लावण्याची ओढाताण करण्याचा कांहीं लोकांकडून जो प्रयत्न केला जात असतो, त्याला येथें वावच राहात नाहीं. सॉंडर्सनें ओळख पटण्याकरितां चौदा निरनिराळया गोष्टी किंवा प्रसंग सांगितले व ते सर्व आर्थर फिंडले ह्यांच्या भावाला पटले.

दुसरे दोन प्रयोग प्रथमश्रेणींतील सर्वोत्तम म्हणून ग्रंथकारानें दिलेले आहेत. तेहि अशाच प्रकारचे आहेत. दुसऱ्या नंबरचा प्रयोग ग्रंथकार फिंडले ह्यांनीं आपले स्नेही रेव्हरेंड जॉन लॅमंड ह्यांचे घरीं ' मॅंटलपीस ' वर एक चित्र पाहिलें होतें त्याला अनुलक्षून होता. त्या संबंधीं फिंडले ह्यांनीं रे लॅमंडना विचारलें, तेव्हां लॅमंड ह्यांनीं असें सांगितलें होतें कीं तें चित्र ' डेव्हिड ड्यू गिड् ' नांवाचे एका चित्रकारानें काढलेलें होतें. तो चित्रकार पुढें मरण पावला. घरांतील मंडळींना तें चित्र विशेष न आवडल्यामुळें प्रथम लॅमंडनीं तें एका पेटींत ठेवलें होतें. पुढें ते एका असल्याच डायरेक्ट व्हॉइस-( Direct Voice ) चे प्रयोगाचे वेळीं हजर होते. तेव्हां ड्यू गिड् ह्यानें त्या प्रयोगांत येऊन तुम्ही " मी काढलेलें चित्र पेटींत ठेवून दिलेलें आहे त्यावरून तुम्हाला त्याची किंमत वाटत नसावी असें वाटतें " असें लॅमंडना म्हटलें. तेव्हां लॅमंडनीं, 'तें चित्र मी आतां आपल्या मॅंटलपीसवर ठेवीन ' असें त्याला सांगितलें व त्याप्रमाणें केलें. पुढें लॅमंड ह्यांचा पॅटरसन् नांवाचा मित्र आर्थर फिंडले यांनीं चालवलेल्या ' एका डायरेक्ट व्हॉइस'चे प्रयोगाचे वेळीं हजर होता. तेव्हां 'ड्यूगिड्' ह्या चित्रकारानें पुन्हां त्या प्रयोगांत भाग घेऊन पॅटर्सनना आपले मित्र लॅमंड ह्यांना त्यांनी सांगितल्याप्रमाणें मॅंटलपीसवर आपलें चित्र ठेविल्याबद्दल आभार कळविण्यांस सांगितलें ! पॅटर्सन ह्यांना त्या चित्राचा पूर्ववृत्तांत माहिती नव्हता. त्यामुळें त्यानां ' ड्यूगिड्'चे बोलण्याचा अर्थ कळला नाहीं. पण ग्रंथकार फिंडले हे त्यांचे बरोबर होते व त्यानां चित्राबद्दल माहिती असल्यामुळें त्यांनी पूर्वीचा वृत्तांत पॅटर्सन ह्यांना सांगितला. तेव्हां त्यांना ड्यूगिड् संदेशाचा उलगडा झाला !

तिसऱ्या प्रथम श्रेणींतील प्रयोगाचे वेळीं मिसेस् वुड् सिमस् म्हणून लीडस् शहरीं नुकतीच आपल्या एका स्नेह्याकडे राहून आलेली एक स्त्री उपस्थित होती. त्या प्रयोगांत लीडस् येथील तिचे स्नेह्याचे ओळखीचे कांहीं मृत व्यक्तींनी उपस्थित होऊन तिला त्यांचेकडे आपले संदेश कळविण्यास सांगितलें त्या माणसांचे संबंधी मिसेस् वुड् सिमस् हिला कांहीं माहिती नव्हती. परंतु पुढें चौकशीकरतां त्या मृत व्यक्ती तिचे स्नेह्यांच्या, खरोखरच ओळखीच्या होत्या असें समजलें. डायरेक्ट व्हॉईसचे प्रयोगांत पुष्कळ मृत व्यक्ती अनपेक्षित रीतीनें येऊन त्यांची इच्छा असेल त्यांचेशीं बोलतात असें प्रयोगांवरून दिसतें. त्यामुळें सामान्यतः










अशा प्रकारचे प्रयोगांत लबाडीबद्दल संशयास जागा नसते व म्हणून हे प्रयोग मृत माणसांचें अस्तित्व व व्यक्तिमत्त्व कायम राहतें ह्याबद्दलचा सर्वोत्कृष्ट पुरावा म्हणून समजले जातात.

आतां वरील सर्व प्रयोगापेक्षांहि कांहीं दृष्टीनें अधिक महत्त्वाचे व आश्चर्यकारक अशा दोन प्रयोगांबद्दल माहिती देऊन हा लेख संपवितों.

## डॉ. फ्रेड्रिक वुड: दोन आश्चर्यजनक प्रयोग

पहिला प्रयोग डॉ. फ्रेड्रिक वुड् ह्यांनीं रोझमेरी नांवाच्या स्त्री-हस्तकामार्फत केलेल्या प्रयोगांपैकीं आहे. रोझमेरीची ' कंट्रोल ' ( नियंत्रिका ) ' नोना ' नांवाची ' स्त्री ' होती. ही स्त्री आपण प्राचीन काळीं इजिप्त देशांत ' फेरो ' (Pharaoh) म्हणून राजे असत, त्यांपैकी एकाची राणी होतें, असें सांगत असे व तिनें त्यावेळची आपली हकीगत सुद्धां डॉ. वुड् यांना सांगितली. त्या वृत्तांतांवरून डॉ. वुड् यानें इजिप्तचे प्राचीन इतिहास पाहून ' नोना ' ही ' अमेन् होटेप् ( तिसरा ) ' या नांवाचे राजाची राणी असावी असा तर्क केला होता. नोनाचे प्रयोगाची हकीकत " दि टू ' वर्ल्डस् ' ह्या नांवाच्या एका वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली होती. ती 'ब्राइटन्' शहरीं राहणाऱ्या ' हॉवर्ड ह्यूम्' नांवाचे एका गृहस्थाचे नजरेस आली. त्या गृहस्थानें जुन्या इजिप्शियन भाषेचा चांगला अभ्यास केला होता; व त्या भाषेचा एक कोष पण तयार केला होता. त्यानें ह्या प्रयोगाबद्दल डॉ. वुडकडून अधिक माहिती मागविली. तेव्हां जी काय माहिती मिळालेली होती ती त्यांस कळविली गेली. पुढें एका प्रयोगाचे अखेरीस ' नोनानें ' Ah-yit-Ah-zula ( आ-यिट्-आ-झुला ) असे शब्द उच्चारले. हे इजिप्शियन भाषेंतील असावेत असें वाटल्यावरून त्यांचे अर्थाबद्दल डॉ. वुड यांनीं ' ह्यूम ' कडे चौकशी केली तेव्हां त्यांचेकडून ते शब्द जुन्या इजिप्शियन भाषेंतील असून त्यांचा अर्थ ' शेवटीं तुम्हास प्रणाम असो. ' असा आहे असें कळलें. प्रथम नोना रोझमेरी मार्फत इंग्लिशमधूनच बोलत असे. ' नोनाला इंग्लिशमधून कसें बोलतां येत असे ' हें एक गूढच आहे. पण मृत माणसाला त्या बाबतींत कांहीं विशिष्ट साधनें असावींत असें दिसतें ' नोना ' पुढें इजिप्शियन भाषेंतून पण बोलूं लागली. त्यामुळें प्राचीन इजिप्शियन भाषेंतील शब्दांचे शुद्ध उच्चारांचा शोध लागला. इजिप्शियन भाषेंतील लेख असलेल्या 'रोझेट्टा' नांवाच्या शिलेचा शोध लागल्यानंतर त्या भाषेची पूर्वी बरीच माहिती उपलब्ध झालेली होती. परंतु त्या भाषेंतील वर्णांचे शुद्ध उच्चारासंबंधीं कोणास माहिती मिळालेली नव्हती. ती ' नोनांनी ' इजिप्शियन भाषेंतून दिलेल्या उत्तरावरून मिळत गेली. पुढें नोनानें अशा तऱ्हेनें दिलेल्या उत्तरांचे ग्रॅमोफोन रेकॉर्डस पण घेतले गेले व त्यामुळें प्राचीन इजिप्शियन भाषेचे शुद्ध उच्चारासंबंधी ज्ञानामध्यें फार महत्त्वाची भर पडली आहे. डॉ. वुड् ह्यांनीं ह्या सर्व प्रयोगाबद्दल सविस्तर हकीगत आपल्या ' After Thirty Centuries ' आणि ' Ancient Egypt speaks ' ह्या पुस्तकांत दिलेली आहे. तीन हजार वर्षांनंतर प्राचीन इजिप्तमधील एका राणीशीं संवाद करणें शक्य होऊन त्यांपासून त्यावेळचे इजिप्शियन भाषेचे आपले ज्ञानांत भर पडावी ही एक कल्पनातीत घटना होय !

दुसरा अशाच प्रकारचा अद्‌भुत प्रयोग म्हणजे डॉ. व्हायमंट् ह्यांचा २५०० वर्षांपूर्वी होऊन गेलेला प्रसिद्ध चिनी तत्त्ववेत्ता ' कॉनफ्यूशिअस् ' ह्याचेशीं झालेला संवाद होय. डॉ. व्हायमंट हे ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीमधील एक नामांकित भाषाविशारद विद्वान् गृहस्थ आहेत. त्यांना अनेक भाषा अवगत असून, जुन्या चिनी भाषेचें पण त्यांना उत्तम ज्ञान आहे. हे गृहस्थ एकदां न्यूयॉर्कमधील आपले स्नेही ' जज् कॅनन् ' ह्यांचे घरीं राहात होते. त्यांनी ह्यापूर्वी परलोकसंशोधनांतील प्रयोगांकडे कधीं







लक्ष दिलेलें नव्हतें, व त्याबद्दल त्यांना कुतूहल पण नव्हतें. पण त्यावेळीं न्यूयॉर्कमध्यें परलोकसंशोधनांतील कांहीं प्रयोग चालूं होते व त्यांपैकीं एका ' डायरेक्ट व्हॉइस् 'च्या प्रयोगांत कोणी एक अदृश्य व्यक्ति अशा एका भाषेमध्यें बोलत होती की, ती भाषा कोणालाच समजत नव्हती ! तेव्हां डॉ. व्हायमंट् हे प्रसिद्ध भाषाविशारद न्यूयार्कमध्यें आलेले आहेत असें समजल्यामुळें त्यांना कदाचित् वरील भाषेचें ज्ञान असेल असें वाटून त्यांना प्रयोगाचे वेळीं हजर राहण्याची विनंति करण्यांत आली व ती त्यांनी मान्य केली. प्रयोगाचे वेळीं डॉ. व्हायमेंट ह्यांनी अदृश्य व्यक्ति ज्या भाषेंत बोलत होती ती ऐकल्यावर ती प्राचीन चिनी भाषा होती हें ओळखलें. बोलणाऱ्या व्यक्तीनें आपलें नांव कुंग्–फु–त्सु– ( = कान्फ्यूशिअस् ) असें सांगितलें व डॉ. व्हायमेंट ह्यांनी विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें जुन्या चिनी भाषेमध्यें भराभर दिलीं. बोलणारी अदृश्य व्यक्ति कान्फ्यूशिअस आहे किंवा काय ह्याची खात्री करून घेण्याकरतां डॉ. व्हायमेंट ह्यांनी अनेक कठीण प्रश्न विचारले. डॉ. व्हायमंट ह्यांनी जुन्या चिनी भाषेंतील कांहीं गोष्टी त्यांना समजल्या नव्हत्या त्यांच्याबद्दल अनेक प्रश्न विचारले, तेव्हां त्यांचा त्या अदृश्य व्यक्तीनें चांगला उलगडा केला. डॉ. व्हायमंट ह्यांना कान्फ्यूशिअसचे कांहीं कवितांचा अर्थ लागत नव्हता, व इतरहि अभ्यासकांना तो समजला नव्हता. अशा कवितांपैकीं एका कवितेची फक्त पहिली ओळ त्यांना आठवत होती. ती म्हणून दाखवून त्यांनी कान्फ्यूशिअसला तिचा अर्थ सांगण्यास विनंति केली. तेव्हां त्यांनीं ती संपूर्ण कविता स्पष्टपणें म्हणून दाखवून तिचा अर्थ विशद करून सांगितला. ह्या सर्व गोष्टींवरून बोलणारी अदृश्य व्यक्ति ' कान्फ्यूशिअस 'च असली पाहिजे अशी डॉ. व्हायमंट ह्यांची खात्री झाली !

डॉ. व्हायमंट न्यूयॉर्कला असतांना लंडनमध्यें पण, अशाच एका प्रयोगामध्यें कॉन्फ्यूशिअस् उपस्थित झाला त्यावेळीं कान्फ्यूशिअस् जें काय बोलला त्याचे ' ग्रामोफोन रेकॉर्ड' घेण्याची व्यवस्था केलेली होती. पुढें डॉ. व्हायमंट लंडनला आले तेव्हां त्यांना ते रेकॉर्डस् ऐकण्याची संधि मिळाली. ते ऐकल्यानंतर न्यूयॉर्कमध्यें ज्या अदृश्य व्यक्तीनें आपलें नांव ' कान्फ्यूशिअस् ' असें सांगितलें होतें त्या व्यक्तीचा व लंडनमध्यें ग्रामोफोन रेकॉर्ड केले होते त्या व्यक्तीचा आवाज एकच होता, ह्याची डॉ. व्हायमंट ह्यांना प्रचीति आली. तात्पर्य, वरील प्रयोगावरून कॉन्फ्यूशिअसनें २५०० वर्षांनंतर न्यूयॉर्क व लंडन येथील परलोकसंशोधनांचे प्रयोगांत उपस्थित होऊन आपलें अस्तित्व व व्यक्तिमत्त्व कायम असल्याची साक्ष दिली असें वरील प्रयोगांवरून स्पष्ट दिसतें. ह्या व नोनाचे प्रयोगांवरून मरणानंतर मनुष्याचें अस्तित्व दीर्घ कालपर्यंत टिकूं शकतें व त्याची स्मृति, बुद्धि वगैरे हजारों वर्षांनंतरहि पूर्ववत् कायम राहूं शकतात असें दिसतें. परलोकसंशोधनांतील बहुतेक प्रयोगांत थोड्या काळापूर्वीं मरण पावलेल्या व्यक्तीशीं संवाद करण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. पण अडीच तीन हजार वर्षांपूर्वीं मरण पावलेल्या व्यक्तीशीं पण परलोकसंशोधनांतील प्रयोगांत संवाद करणें शक्य होतें, हें वरील दोन प्रयोगांवरून दिसतें व त्या दृष्टीनें हे प्रयोग ह्या युगांतील लोकोत्तर चमत्कारच समजले पाहिजेत.

## प्रयोगांचा निष्कर्ष

वरील सर्व प्रयोग इतके अद्भुत आहेत कीं त्यावर विश्वास ठेवणें देखील फार कठीण वाटतें. पण ते विद्वान् शास्त्रज्ञ लोकांनीं अत्यंत काळजीपूर्वक रीतीनें करून त्यांचे सत्यतेबद्दल आपली खात्री करून घेतली आहे असें दिसतें. त्यामुळें त्या प्रयोगांत आलेल्या अनुभवाबद्दल संशय घेण्यास कांहीं



अनुक्रमणिका






योग्य कारण दिसत नाहीं. ह्या प्रयोगांवरून आपण राहतो त्या जगांपेक्षा एक निराळी अदृश्य सृष्टि आपले भोंवतीं आहे व त्या सृष्टींत मनुष्य मरणोत्तर जातो व त्याचे संस्कार, स्मृति, व्यक्तिमत्त्व वगैरे तेथें कायम राहतात, व कांहीं विशिष्ट परिस्थितींत तो ह्या लोकांतील मनुष्यांशीं बोलूं शकतो असें मानण्यास चांगला पुरावा मिळाला आहे असें दिसतें. कांहीं शास्त्रज्ञांना अजूनहि ह्याविषयी शंका वाटते, व ते आलेल्या अनुभवांची दुसऱ्या कांहीतरी मार्गानें उपपत्ति लावण्याचा प्रयत्न करीत असतात; पण तो प्रयत्न ओढाताणीचा वाटतो. ह्याचे उलट कांही सुप्रसिद्ध शास्त्रज्ञांनी आतां वरील सिद्धांत मान्य केलेले आहेत व त्यांनी आपलें मत आपल्या पुस्तकांतून स्वष्टपणें प्रसिद्ध केलेलें आहे. शिवाय, मृत माणसांचे अस्तित्वाबद्दल सामान्य माणसांसहि प्लँचेट वगैरे साधनांनी स्वत: प्रयोग करून खात्री करून घेणें शक्य झालेलें आहे व अशा तऱ्हेनें लक्षावधि लोकांनी निरनिराळया देशांतून प्रयोग करून व आपल्या मृत बांधवांशीं अथवा मित्रांशीं बोलून खात्री करून घेतलेली आहे. परलोकसंशोधनाचें काम, अदृश्य सृष्टीशीं संबंध असल्यामुळें कठीण आहे, त्यांत अनेक अडचणी आहेत, व अजून अपूर्णता आहे ही गोष्ट खरी. पण अदृश्य सृष्टीशीं संबंध जोडून त्यांतील व्यक्तींशीं विचारविनिमय करण्याचे जे निरनिराळे प्रकार उपलब्ध झाले आहेत, त्यावरून त्या सृष्टीबद्दलचे आपले प्रयोगसिद्ध ज्ञानांत उत्तरोत्तर पुष्कळ भर पडत जाईल व त्यामुळें धर्म, व तत्त्वज्ञान ह्यांमधील परलोकांसंबंधी सिद्धांतांवर पुष्कळ महत्त्वाचा प्रकाश पडेल अशी अपेक्षा करण्यास हरकत दिसत नाहीं.

---

## रामायणाचें महत्त्व :

रामायणाहून श्रेष्ठ असा दुसरा चित्तशुद्धिकारक ग्रंथ माझ्या पाहण्यांत नाहीं. हिंदुधर्मापुरतें बोलायचें तर गीता सुद्धां दुय्यम दर्जाची ठरेल. गीता हें नवनीत आहे. प्रत्येकजण तें पचवूं शकत नाहीं. रामायण हें दूध आहे. दूध तर लहान मूल सुद्धां पचवूं शकतें. म्हणून रामायणानें चित्तशुद्धीचें जें काम केलें आणि आज सुद्धां जें तें करीत आहे, तें गीता देखील करूं शकत नाहीं. सर्व भारताची रामायणाकडे पाहण्याची कोणती दृष्टि आहे हें यावरून तुमच्या ध्यानांत येईल. मी शेकडों वेळां रामायण वाचलें आहे व तें भारताच्या अनेक भाषांतून वाचलें आहे. आजहि एखाद्या नव्या लेखकाचें रामायण माझ्या हातीं आलें तर मी तें वाचल्याशिवाय राहत नाहीं. एकेका भाषेंत दहा वीस कवींनीं रामायण लिहिलेलें आहे.

" भक्तीचा विकास करणारा रामायणासारखा दुसरा ग्रंथ मला आढळला नाहीं " असें गांधीजी सांगत. त्यांच्या डोळयांसमोर तुलसीरामायण होतें. उत्तर भारतांत त्याचाच सार्वत्रिक प्रचार आहे. त्यांतला राम आत्माराम, हृदयांतला अंतर्यामी राम, आहे. रावणादि विकारांपासून हृदय मुक्त होतें तेव्हां त्यांत रामचंद्राची ज्योति प्रवेश करते. तें जगच निराळें आहे. त्या दुनियेंत कोणत्याहि प्रकारचे राग-द्वेष असत नाहींत. केवळ परिशुद्ध भक्तिभाव राहतो. असें दिव्य वातावरण रामायण निर्माण करतें. दुसऱ्या ग्रंथांत असें क्वचितच आढळतें. भारतानें अनेक वेळां आपलें स्वातंत्र्य गमावलें, पण तरीहि भारत टिकून राहिला. रामायण गमावलें असतें तर मात्र भारत अवश्य नष्ट झाला असता. पण भारतांत रामायण टिकलें म्हणून भारत गुलामीनंतरहि डोकें वर काढूं शकला.

— विनोबा



अनुक्रमणिका






## पत्रव्यवहार

### आमची बुद्धिवादी परंपरा

श्री. कार्यकारी संपादक, ' नवभारत ' यास—

' नवभारता'च्या डिसेंबर १९५६ च्या अंकांत प्रसिद्ध झालेलें कु. दाभोळकर यांचें पत्र वाचलें. त्यांनीं उपस्थित केलेल्या कांहीं मुद्द्यांचीं खालीं थोडक्यांत उत्तरें देतों.

( १ ) प्रा. रानडे यांनीं दिलेली गुरूची व्याख्या शब्दशः नवीन नाहीं हें मला संतवाङ्मयाचा अभ्यास नसतांनाहि माहित होतें. मी केलेल्या शब्दप्रयोगाचा उद्देश कु. दाभोळकरांच्या लक्षांत आलेला दिसत नाहीं.

( २ ) कु. दाभोळकरांनीं बुद्धिवाद म्हणजे काय याची चुकीची कल्पना करून घेतलेली दिसते, आणि त्यामुळें त्यांनीं बुद्धिवाद्यांवर अन्याय केला आहे. कारण, बुद्धिवादी लोकांच्या जीवनांमध्यें छिद्रान्वेषी वृत्ती- ( cynicism ) ला स्थान नसतें. उलट, मानवीमूल्यांच्या प्रस्थापनेकरितां त्यांनीं त्यागाची परिसीमा केली आहे असें बुद्धिवादाचा इतिहास सांगतो.

( ३ ) आत्म्याचें शरीरापासून वेगळें अस्तित्व मान्य केलें तर विज्ञानशास्त्राला धाब्यावर कां बसवावें लागेल, हें विज्ञान माहित नसलेल्यांना न कळणें स्वाभाविक आहे. त्यावर साधा व बिनचूक उपाय म्हणजे विज्ञानाची कार्यपद्धति व त्यानें उपलब्ध करून दिलेलें ज्ञान आत्मसात् करून घेणें हा होय.

( ४ ) कुठल्याहि तत्त्वज्ञानांत ज्ञानमीमांसा ( Theory of knowledge ) म्हणून एक महत्त्वाचें अंग असतें. त्याचे कांहीं नियम असतात, व जोपर्यंत ते नियमच चुकीचे आहेत असें समजायला सबळ कारण मिळत नाहीं तोपर्यंत आपल्याला कटु वाटणारे निष्कर्षसुद्धां मान्य केले पाहिजेत. असें करतांना प्रत्येक – ism सदोष आहे असें आढळून आलें तर त्याला उपाय नाहीं. भावनांच्या समाधानाकरितां सत्याशीं प्रतारणा करणें योग्य होणार नाहीं. विज्ञानाधिष्ठित ज्ञानमीमांसेच्या निकषावर अध्यात्मशास्त्र व गूढवाद तपासून पाहिल्यास त्यांनीं केलेलीं आत्मा, देव, भूतबाधा, इत्यादि संबंधीचीं विधानें टिकूं शकणार नाहींत.

( ५ ) अतीन्द्रिय ज्ञान शक्य नाहीं असें मीं म्हटलेलें नाहीं. तथापि अतींद्रिय ज्ञान शक्य आहे हें प्रयोगांतीं सिद्ध झालें आहे असें म्हणणारांनीं संख्याशास्त्राच्या मदतीनें निष्कर्ष काढतांना घ्यावी लागणारी दक्षता पुरेशी घेतलेली नाहीं असें माझें मत आहे.

( ६ ) ''इष्ट असेल तें बोलणार व शक्य असेल तें करणार '', या आगरकरी ब्रीदाच्या दुसऱ्या भागांत बुद्धिवाद मानवीजीवनांत अपुरा पडतो याची कबूली नसून, आपल्याला शक्य असेल तें सर्व आचरणांत आणण्याचा आगरकरांचा निर्धार व्यक्त झालेला आहे. मराठी माझी मातृभाषा नसल्यामुळें माझा समज चुकीचा असण्याचा संभव आहे हें मी मान्य करतों, परंतु माझ्या लेखाचा उद्देश आगरकरांचें ( गरज नसतांना ) समर्थन करण्याचा, किंवा बुद्धिवाद श्रद्धावादापेक्षां श्रेष्ठ कसा आहे, हें दाखविण्याचा नव्हता. माझ्या लेखाचा मुख्य उद्देश भारताच्या अन्य भागांतच नव्हे तर बुद्धिवादाच्या ' माय भूमींत ' सुद्धां आगरकरी परंपरा कशी लुप्तप्राय झाली आहे, हें दाखविण्याचा होता. त्याकरितां दिलेलीं उदाहरणें प्रातिनिधिक स्वरूपाचीं नाहींत असें कु. दाभोळकर म्हणतात. त्यांचें म्हणणें बरोबर असतें तर मी तो लेख लिहिलाच नसता. दुर्दैवानें वस्तुस्थिति लेखांत लिहिल्यापेक्षां कितीतरी वाईट आहे. कु. दाभोळकरांचें ' सात्त्विक ' संतापानें भरलेलें पत्र माझ्या वरील विधानांचा एक सूचक पुरावा आहे. परंतु मी अजून निराशावादी झालों नाहीं.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें ४ — अ. भि. शहा.
ता. ८-१२-५६








## भारतीय शिक्षणक्षेत्रांत इंग्रजीभाषेचें स्थान

श्री. कार्य. संपादक, नवभारत मासिक, यांस–

ऑक्टोबर-नोव्हेंबरच्या अंकांत श्री. झिणाभाई देसाई ह्यांनीं वरील विषयावर आपले परिपक्व विचार मांडलेले आहेत. त्या विचाराशीं मी सहमत आहे. आणि त्या विचारांना पूरक असा एक विचार येथें मांडीत आहे.

इंग्रजी भाषेमुळें अनेक उपकार झाले असले तरी ह्या स्वातंत्र्योत्तर कालामध्यें तीच भाषा माध्यम म्हणून चालू ठेवल्यास नुकसानच ज्यास्त होण्याचा संभव आहे. इंग्लिश-शिक्षित अल्पसंख्यलोक व बहुजनसमाज ह्यांचे संबंध दुरावतील. सुशिक्षित लोकांच्या मनांत भयंकर न्यूनगंड तयार होईल. माध्यमिक शिक्षणामध्यें इंग्रजीला अवास्तव महत्त्व द्यावें लागेल, त्यामुळें इतर विषयांचा संकोच करावा लागेल अशी अनर्थपरंपरा ओढवेल.

अशा निराशामय परिस्थितीमध्यें देखील एक धागा असा आहे कीं ज्याची योग्य जोपासना झाल्यास इंग्रजीचा अभ्यास सुलभ होईल.

हा धागा म्हणजे देवनागरी लिपी. भाषेचे दोन पंख म्हणजे शब्दांचे उच्चार व त्यांची लिपी. भारतामध्यें अलीकडल्या काळांत इंग्रजीभाषेमुळें जसा एकजिनसीपणा निर्माण झाला त्याप्रमाणेंच पुरातन कालामध्यें संस्कृतभाषेमुळें ऐक्यभावना उत्पन्न झाली होती. आणि ह्या संस्कृतभाषेची लिपी देवनागरी आहे. शिवाय संस्कृत भाषेचें अध्ययन सध्यां अखिल-भारतीय स्वरूपाचें असल्यामुळें व हिंदी भाषेचा प्रसारहि मोठ्या प्रमाणावर झाला असल्यामुळें, भारतांतील सर्व राज्यांतील सुशिक्षित लोकांना ही देवनागरी लिपी अवगत आहे. ह्या देवनागरी लिपीचें एक वैशिष्ट्य म्हणजे ती उच्चाराधिष्ठित ( Phonetic ) आहे. एक अक्षराचा एकच उच्चार होऊं शकतो.

इंग्रजी भाषा शिकण्यास फार कठीण असते. इंग्लिश भाषेची लिपी अगदीं निराळी, तिच्यांतील शब्दांची विचित्र अक्षररचना ( spelling ) व शब्दांचे अनपेक्षित उच्चार, वाक्यरचनेची घडण अगदींच निराळी. उदा० क्रियापद मध्यें आणि कर्म शेवटीं असतें. मी माध्यमिक शिक्षणक्षेत्रांत गेलीं ३०–३२ वर्षें काम केलें आहे. माझ्या अनुभवावरून मी सांगूं शकतो कीं, मुलांना इंग्रजी शिकण्यामध्यें स्पेलिंग व शब्दांचे उच्चार ह्याची फार मोठी अडचण भासते.

ह्या सर्व परिस्थितीचा विचार करतां असें दिसतें कीं इंग्रजी शिकण्यामध्यें इंग्रजी लिपीचा उपयोग न करतां देवनागरी लिपी जर उपयोगांत आणली तर स्पेलिंग व उच्चार ह्या अडचणी एकदम नाहींशा होतील. ही माझी सूचना पुष्कळांना प्रथम-दर्शनी चमत्कारिक वाटेल, परंतु थोड्या विचारानंतर ती पसंत पडेल अशी माझी श्रद्धा आहे. ह्याचीं कारणें मी पुढें देत आहे.

( १ ) इंग्लंडमध्यें संस्कृत अध्ययनाकरितां हितोपदेश, पंचतंत्रासारखें वाङ्मय इंग्रजी लिपीत छापलें जातें. भगवद्गीतेचा पवित्र ग्रंथहि त्याच लिपीत छापतात.

( २ ) भारतीय नभोवाणीची मुखपत्रिका जी ' इंडियन लिसनर', तिच्या इंग्रजी आवृत्तींत, हिंदी भाषेंतील वाक्येच्यावाक्यें रोमन लिपींत छापलीं जातात.

( ३ ) दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या वेळीं हिंदुस्थानांत, लष्करांतील इंग्रज व अमेरिकन ह्यांच्या सोईकरिता ' रोमन उर्दू ' ह्या कृत्रिम भाषेचा फैलाव केला जात असे.

वरील विवेचनावरून हें स्पष्ट होईल कीं परकीय-भाषेचा व्यावहारिक अभ्यास करावयाचा असतांना स्वतःची लिपी वापरल्यास अर्ध्याअधिक अडचणी दूर होतात.

इंग्रजी शिक्षणामध्यें देवनागरीचा अवलंब केल्यास कितीतरी फायदे होतील.








(१) इंग्रजीच्या अभ्यासाकरितां माध्यमिक शाळेमध्यें चार वर्षें पुरे होतील. सहा वर्षांची जरूरी नाहीं. इंग्रजी भाषेची आवश्यकता मुख्यत्वें भारतांतीलच राज्याराज्यामधल्या व्यवहाराकरितां आहे. आणि सर्वांना देवनागरी लिपी अवगत आहेच. इंग्लंड-अमेरिकेंतील लोकांशीं पत्रव्यवहार करण्याचे प्रसंग फारच तुरळक असणार.

भारतामध्यें भाषा जरी एक नसली, तरी निदान एक लिपी झाल्यास, जनतेमध्यें एकजिनसीपणा उत्पन्न होईल. दाक्षिणात्यांचा जो हिंदीला विरोध व इंग्रजीचा आग्रह आहे त्याला धार न येतां तो बोथट होत जातील.

सध्यां भारतामध्यें निरनिराळया भाषांबद्दल आदर उत्पन्न होण्याकरितां उत्तमोत्तम वाङ्मयाची भाषांतरें व्हावींत असा प्रयत्न चालूंच आहे. त्यांतील पहिलें पाऊल म्हणून सर्व भाषा देवनागरी लिपीत लिहिण्यास सुरुवात करावी. ' देवनागर ' मासिकामध्यें हा उपक्रम सुरू झालाच आहे. इंग्रजी भाषांहि देवनागरीमध्यें लिहिण्यास सुरुवात झाल्यास, भारतामध्यें सर्वत्र पसरण्यास फार वेळ लागणार नाहीं. बोलपट निर्माण होऊ लागतांच, मूकपट जसे नाहींसे झाले तितक्या गतीनेंच हाहि बदल सहज घडून येईल. म्हणून माझी नम्र सूचना थोडक्यांत अशी आहे.

(१) माध्यमिक शाळेमध्यें व पदवीपरीक्षेपर्यंत इंग्रजी भाषा देवनागरी लिपींतून लिहिण्याचा विकल्प ( option ) ठेवावा. लिपीची सक्ती करण्याची कांहीं जरूर नाहीं. रोमन लिपी आपोआपच नामशेष होईल.

(२) व्यवहाराकरितांच आम्हास इंग्रजी भाषेचा अभ्यास कर्तव्य असल्यामुळें, त्या भाषेंतील पद्य-वाङ्मयाच्या अभ्यासाची कांहीं आवश्यकता नाहीं; फक्त गद्य-वाङ्मयाचा अंतर्भाव करावा.

(३) भारतांतील कोणत्याहि भाषेचा अभ्यास करण्यामध्यें देवनागरी लिपीचा विकल्प मान्य करावा.

(४) ज्यांना परदेशाशीं पत्रव्यवहार करावयाचा असेल, तसेंच ज्यांना त्या भाषेंतील उच्च वाङ्मयाचा अभ्यास करावयाचा असेल त्यांच्याकरितां डिप्लोमाचे अभ्यासक्रम ठेवावेत.

पुणें,
ता. ८–१२–५६

आपला
के. वि. हेर्लेकर

---

श्री. कार्यकारी संपादक, ' नवभारत ' यांस –

प्रा. म. दा. साठे यांचा 'महाराष्ट्रांतील पंडित-परंपरा ' हा डिसेंबर १९५६ च्या नवभारताच्या अंकांतील उद्बोधक लेख वाचला.

सदरहू लेखांत पान २६ मध्यें डॉ. कीलहॉर्न यांचेबद्दल त्यांनी जी माहिती दिली आहे ती थोडी चुकीची आहे व ती चूक दर्शविल्यास अप्रस्तुत होणार नाहीं असें वाटल्यावरून मी खालील माहिती आपणांस 'नवभारत' मध्यें प्रसिद्ध करण्याची विनंति करीत आहे.

डॉ. कीलहॉर्न हे आंग्ल पंडित नसून जर्मन पंडित होते. व ते एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें प्राध्यापक नसून डेक्कन कॉलेजमध्यें प्राध्यापक होते; व त्यांचे नोकरीचा बहुतेक सर्व काल डेक्कन कॉलेजमध्येंच गेला असा उल्लेख ले. जे. नेल्सन फ्रेजरकृत Deccan College-A Retrospect 1851-1901 या पुस्तकांत पान ७०–७१ वर सांपडतो.

अकोला.
दि. १३-१२-१९५६

– ए. रा. महाजनि

---








## पुस्तक-परामर्श

### ‘ कृष्णमूर्ति व शांत चित्ताची अनुभूति ’

Krishnamurti and the Experience of the Silent Mind - by A. D. Dhopeshwarkar, M. A., LL. B., Published by Chetana Ltd; 34 Rampart Row, Bombay 1 (1956) pp. 177. Price Rs. 4.

अलीकडे गेलीं कांहीं वर्षे जे. कृष्णमूर्तींविषयीं बरेंच कुतूहल निर्माण झालें असून, त्यांच्या विचारांनीं विचारवंतांच्या मनाची पकड घेतली असल्याचें दिसून येतें. याला कारण त्यांच्या विचारांत व ते ज्या पद्धतींत आपले विचार मांडतात त्या पद्धतीचे जें एक अपूर्व वैशिष्ट्य किंवा वेगळेंपण आढळून येतें तें तर आहेच; त्याबरोबरच त्यांच्या विचारांना व विचारप्रतिपादनाला जिवंतपणा आणून देणारी त्यांच्या जीवनाची अद्भुतरम्य पार्श्वभूमि हेंहि कारण असावें. जो लहानपणींच भावी जगद्गुरु म्हणून दत्तक घेतला जाऊन त्याचें त्या दृष्टीनें संगोपन-संवर्धन-शिक्षण झालें, ज्याच्याकरितां एक खास ‘ पूर्व-तारक-संघ ’ या नांवाचें गुरुपीठ निर्माण केलें जाऊन तद्द्वारें ज्याची भावी ‘ जगद्गुरु ’ म्हणून ग्वाही मिरविली गेली, जगांतील देशोदेशींच्या असंख्य सुशिक्षित भक्तगणांकडून मोठ्या भक्तिभावानें ज्याची सतत १७।१८ वर्षे अर्चना होऊन या जगद्-गुरूच्या तोंडून आतां कोणता दिव्य-संदेश ऐकायला मिळणार याची मोठ्या औत्सुक्यानें प्रतीक्षा केली गेली, त्यानें १९२९ सालीं एका दिवशीं ‘ भल्या सुप्रभातीं ’ तें जगद्गुरुपद चुटकीं-सरसें झुगारून देऊन जगद्गुरु बनविणारी संघटनाच बरखास्त करून टाकावी आणि तेव्हांपासून, आचारविचारांतील सर्व प्रकारच्या गुरुबाजीविरुद्ध, बुवाबाजीविरुद्ध व शब्दप्रामाण्याविरुद्ध बंड पुकारून, एकाकीपणा पतकरून ‘ प्रत्येक माणसाचें व्यक्तित्व बंधनमुक्त, स्वतंत्र रहावें ’ या विचाराच्या प्रसारार्थ आपलें जीवन समर्पित करून रहावें— ही घटनाच असाधारण व मोठी विस्मयजनक आहे. यामुळें अशा व्यक्तीविषयीं व त्याच्या विचारांविषयीं कुतूहल व आकर्षण वाटत असल्यास नवल नाहीं.

कृष्णमूर्ति सुमारें गेलीं दोन तपें आपले विचार युरोप–अमेरिकेंतील समाजापुढें सांगत आले आहेत. या काळांत त्यांच्या तत्त्वज्ञानावर Carls Suares, Rene Fouere अशांसारख्या अनेक पाश्चात्त्य विचारवंतांचे ग्रंथ प्रसिद्ध झाले असून त्यांवरून कृष्ण-मूर्तींच्या विचारांचा कांहीं आधुनिक पाश्चात्त्य विचारवंतांवर किती प्रभाव पडला आहे याची कल्पना येते. १९४७ सालापासून भारतांतील मद्रास, मुंबई, पुणें, दिल्ली इत्यादि शहरांतून त्यांचीं प्रवचनें झालीं असून तीं प्रवचनें पुस्तकरूपानें प्रसिद्धहि झालीं आहेत. त्यांच्या विचारांनीं भारतीय विचारवंतहि प्रभावित झाले असून त्यांच्या विचारांचें आस्थापूर्वक अध्ययन–मनन होऊं लागलें आहे. त्याचीच एक महत्त्वाची साक्ष म्हणून प्रस्तुत श्री. धोपेश्वरकरांचा ग्रंथ होय. या ग्रंथाचे लेखक स्वतः तत्त्वज्ञानाच्या अध्ययन-अध्यापनांत व व्यासंगांत जीवन व्यतीत केलेले असल्यामुळें त्यांच्या कृष्णमूर्तींच्या विचारांवरील या ग्रंथाला विशेषच महत्त्व आहे.

आपल्या या ग्रंथाला जें लेखकानें नांव दिलें आहे व आंतील त्यांच नांवाच्या एका स्वतंत्र प्रकरणा







जें त्यांनीं विवेचन केलें आहे तें पाहतां, त्यांच्या मतें '**शांत मनाची अनुभूति**' हा कृष्णमूर्तींच्या तत्त्वज्ञानाचा गाभा असावा असें समजण्यास हरकत नाहीं. कृष्णमूर्तींच्या विचारांचें सार ज्यांत त्यांच्याच शब्दांत ग्रथित झालें आहे असा एक कृष्णमूर्तींचा ग्रंथ 'The First and Last Freedom' या नांवाचा नुकताच दोन वर्षां-पूर्वीं प्रसिद्ध झाला आहे. हा ग्रंथ त्यांच्या विचारांचें सार म्हणून साधारणपणें आधारभूत समजला जातो. या ग्रंथाच्या नांवांतहि कृष्णमूर्तींच्या तत्त्वज्ञानाचा आशय सांठविला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. 'मानवाचें अथपासून इतिपर्यंत स्वातंत्र्य' हा तो आशय होय. हें साध्य गांठण्याचें एकमेव साधन म्हणजे माणसाचें मन निर्लेप, मुक्त व शांत होणें हें आहे. हें साधन साध्याशीं इतकें एकरूप आहे, कीं श्री. घोपेश्वरकरांनीं 'शांत मनाची अनुभूति' हें नांव आपल्या ग्रंथाला देऊन मूळ अनुभूति एकच पण वर्णनाचे प्रकार दोन हें मार्मिकपणें सूचित केलें आहे.

श्री. घोपेश्वरकर यांनीं आपल्या प्रतिपादनांत कृष्णमूर्तींच्या विचारसरणीचे विवेचनाच्या सोयीकरितां स्थूल मानानें दोन विभाग पाडले आहेत : एक विभाग म्हणजे आपल्या मानसिक जीवनांतील संघर्ष, गोंधळ, अनिष्ट गोष्टी उलगडून दाखविणारा, जें नको त्याचें दर्शन करून देणारा ( negative ) विभाग. व दुसरा म्हणजे मानसिक जीवनांतील त्या अनिष्ट गोष्टींचें ज्यायोगें निराकरण होईल असे निश्चित उपाय सुचविणारा ( positive ) विभाग.

कृष्णमूर्तींच्या मतें मनुष्याच्या स्मरणशक्तीचे दोन प्रकार आहेत : एक वस्तुगत ( factual ) स्मरणशक्ति – जिचा शास्त्रीय ज्ञानसंपादनांत, मानवाच्या भौतिक प्रगतींत उपयोग होऊं शकतो ती. दुसरी म्हणजे इष्टानिष्ट भावनांच्या संस्कारांनीं लडबडलेली, मनुष्याच्या 'अहं-' भोवतीं पिंगा घालून अहंकाराला स्थिर करणारी, माणसांच्या मानसिक जीवनाला नाना रंगांचे लेप देणारी भावनांकित[१] ( psychological ) स्मरणशक्ति – त्याचप्रमाणें, कृष्णमूर्तींच्या मतें माणसाच्या मनाचींहि दोन स्वरूपें आहेत. एक स्वरूप म्हणजे अनुभवांना 'नांवें' ठेवणारें, इष्टानिष्ट गोष्टींशीं मंडन-खंडनपूर्वक तादात्म्य पावणारें, हर्षामर्ष व रागद्वेष यांच्या आहारीं जाणारें, नाना ध्येयें- गुरुसंप्रदाय यांच्या मागें धांवणारें, सदैव 'अशांत' असणारें, कोलाहलपूर्ण असें शब्दप्रसवी 'मुखर[१]' ( verbal ) मन. दुसरें स्वरूप म्हणजे नांवें न ठेवणारें, 'हवें-नको' न म्हणणारें, तटस्थपणानें पहाणारें, केवळ साक्षित्व (Choiceless awareness ) बाळगणारें नीरव 'शांत' (silent) मन. कृष्णमूर्तींचें म्हणणें असें कीं, या पहिल्या स्वरूपाच्या 'मुखर' ( verbal ) मनानें वर वर्णन केलेल्या दुसऱ्या प्रकारच्या ( phychological ) भावनांकित स्मरणशक्तीचा वापर करून मानवी जीवनांत घोर अनर्थ माजविला आहे. भूतकालीन भावनांकित स्मृतींच्या द्वारें व्यवहार करणारें 'मुखर' (verbal) मन हेंच समाजांतील मानवामानवांमधील संघर्षाचें मूळ होय ही जाणीव जर जळजळीतपणें माणसास झाली तर त्याचें चित्त 'शांत' ( silent ) होऊन, त्या 'शान्त' चित्ताच्या अनुभूतींतून मानवामानवांच्या परस्परसंबंधांत जिव्हाळा, प्रेम, बंधुभाव, स्वातंत्र्य, निर्भयता या गोष्टी उदित होतील; किंबहुना या गोष्टी 'शांत' मनाच्या अनुभूतीचा दुसरा पर्यायच होत.

श्री. घोपेश्वरकर यांच्या प्रस्तुत ग्रंथांतील विवेचनाचा स्थूल सारांश वर दिला आहे. ग्रंथांत

१ हे शब्द मूळ इंग्रजी शब्दाच कांटेकोर पर्याय नसून, मुळांतील आशय व्यक्त करण्याकरितां ते योजले आहेत.








कृष्णमूर्तींच्या विचारांचें मूळ विवेचन मानसशास्त्राच्या आधारें केलें असून, त्याचा आशय उदाहरणांनीं विशद केला आहे. ग्रंथाच्या मुख्य चार प्रकरणांपैकीं पहिल्या दोन प्रकरणांतून, स्मरणशक्तीचे दोन प्रकार व दुसऱ्या प्रकारच्या स्मरणशक्तीच्या साहाय्यानें 'मुखर' (verbal) मनानें माजविलेला अनर्थ यांचें प्रतिपादन केलें असून, नंतरच्या दोन प्रकरणांतून 'शांत' मन व त्यांतून उदित होणारे परिणाम यांचे सविस्तर वर्णन केलें आहे. मनें दोन नसून एकाच चित्ताच्या या दोन भिन्न अवस्था होत हें त्यांनीं मुद्दाम स्पष्ट केलें आहे. नेहमींच्या 'मुखर' मनापेक्षां 'शांत' मन ही अवस्था हा एक मानवाच्या आंतरिक जीवनाचा निराळाच आविष्कार आहे. या आविष्काराचा निराळेपणा स्पष्ट करण्याकरितां म्हणून लेखकानें 'शांत' मनालाच 'हृदय' (heart) हा दुसरा पर्याय योजिला असून, मन 'शांत' झाल्यावर आंतरिक जीवनांत उदित होणारी प्रसन्नता, निर्भयता, मुक्तता इत्यादि भावसंपदा हा हृदयाचाच आविष्कार होय असें म्हटलें आहे.— लेखकानें कृष्णमूर्तींच्या विचारांचें विवेचन शक्यतों शास्त्रीय भूमिकेवरून मोठ्या जिव्हाळ्यानें व समरसून केलें आहे. प्रतिपादनांत युक्तिवादांच्या दृष्टीनें मधूनमधून पुनरुक्ति वाटत असली तरी, एक अभिनव विषय समजावून सांगण्याच्या लेखकाच्या जिव्हाळ्यामुळें व वक्तृत्वपूर्ण शैलीमुळें, ती पुनरुक्ति खटकत नाहीं.

श्री. धोपेश्वरकरांचा प्रस्तुत ग्रंथ हा कृष्णमूर्तींच्या विचारांवरील भाष्य आहे. कृष्णमूर्तींचे विचारांचा श्रवण-वाचनद्वारें ज्यांनीं परिचय करून घेतला आहे, त्यांच्यापैकीं कांहींना त्या विचारांचे चिकित्सा-पूर्वक परीक्षणहि व्हावें अशी अपेक्षा असते. पण तशा प्रकारच्या चिकित्सापूर्वक परीक्षणाची भूमिका प्रस्तुत ग्रंथांत आढळून येत नाहीं.

कृष्णमूर्तींचे विचार अगदीं सहानुभूतिपूर्वक समजून घेऊं इच्छिणाऱ्यांना त्यांच्या विचारांतील कांहीं स्थळें दुर्बोध वाटून त्यांबद्दल अनेक शंका निर्माण झाल्याशिवाय राहत नाहींत. उदाहरणार्थ, स्मरणशक्ती- (memory) चे पाडलेले दोन प्रकार—एक वस्तुगत स्मरणशक्ति व दुसरी भावनांकित (psychological) स्मरणशक्ति. सूक्ष्मपणें पाहूं जातां असे कांटेकोर भेद पडूं शकतील कीं नाहीं याची शंका वाटते. माणसाला कार्यक्षम रीतीनें जगावयाचें असल्यास बाह्य परिस्थितीचें आव्हान स्वीकारून, त्या परिस्थितीला तोंड देऊनच जगावें लागतें. बाह्य परिस्थितीचें आव्हान स्वीकारतांना माणसाचें वस्तुगत स्मृतींनीं व भावनांकित स्मृतींनीं भरलेलें सर्वच्या सर्व व्यक्तित्व आपल्या सर्व स्मृतींच्या बळावरच परिस्थितीला प्रत्युत्तर देत असतें. परि-स्थितिप्राप्त प्रसंगाला तोंड देतांना, कृष्णमूर्ति सुच-वितात त्या प्रमाणें, सर्व प्रकारच्या शुभाशुभ भाव-नांकित स्मृतींच्या पटलापासून मुक्त व्हायचें झाल्यास, माणसाचें परिस्थितीला तोंड देणारें व्यक्तित्व त्या मानानें विकल होण्याची व त्या मानानें माणसाची जीवनांतील कार्यक्षमता कमी होण्याची शक्यता वाटते.— तसेंच कृष्णमूर्तींची 'शांत' मनाची कल्पना सकृद्दर्शनीं अत्यंत आकर्षक वाटत असली तरी ती इतकी तरळ आहे कीं ती केवळ एक कल्पना-विलासच ठरणार नाहीं ना अशी शंका वाटूं लागते. भूतकालाच्या सर्व प्रकारच्या भावनांकित स्मृतीं-पासून तसेंच भविष्यकालच्या सर्व प्रकारच्या शुभा-शुभ आशा-आकांक्षांपासून मुक्त झालेलें, केवळ वर्तमानकाळांतच रमून जाणारें चित्त 'शांत' होय अशी ही कल्पना आहे. खरें पाहूं जातां, मानवानें आतांपर्यंत निर्माण केलेली भव्य संस्कृति ही मानवाच्या सुंदर व पवित्र म्हणून गणल्या गेलेल्या कांहीं भूतकालीन भावनांकित स्मृतींवर व भविष्य-कालीन उदात्त ध्येयांचीं सुखस्वप्नें पहाण्याच्या त्याच्या प्रवृत्तीवर—मानवाच्या 'क्रान्तदर्शित्वा'वर उभारलेली आहे. बऱ्यावाईट अशा सर्वच भूतकालीन भावनां-








कित संस्कारांना व भविष्यकालीन सदसत् अशा सर्वच आशा-आकांक्षांना थारा न देणारें चित्त 'शांत' होईलहि; पण असें संस्कारहीन चित्त संस्कृतिहीन तर होणार नाहीं ना अशी शंका येते.

शिवाय, चित्त 'शांत' झाल्यावर, त्या 'हृदयां'-च्या अवस्थेतून प्रेम, निर्भयता, स्वातंत्र्य, प्रसन्नता या भावना आपोआप उमळून येतात ही कृष्णमूर्तींची कल्पनाहि गूढगुंजनासारखी रमणीय असली तरी ती तितकीच आत्यंतिक व अगम्य वाटल्याशिवाय रहात नाहीं. मानवाचें मन जात्याच चांगलें, शुभ आहे, तें प्रेम स्वातंत्र्य, निर्भयता इत्यादि शुभ भावनांचें जात्याच माहेर आहे. अशी जी कांहीं दिव्य-निसर्ग-रम्यतावाद्यांची रम्य ( romantic ) कल्पना असते तिची येथें आठवण होते. खरें पाहूं जातां, प्रेम, स्वातंत्र्य, निर्भयता, प्रसन्नता या भावनांचा आशय हजारों वर्षांच्या मानवी संस्कृतीच्या इतिहासाच्या मार्गक्रमणांत विकसित व परिपुष्ट झाला आहे. युगानुयुगांच्या भूतकालीन शुभ संस्कारांच्या व भविष्यकालीन ध्येयदर्शी प्रवृत्तींच्या मानवी प्रेरणा या भावनांतून अनुस्यूत आहेत. या भावनांचा अनुभव भूतकालीन शुभ संस्कारांचा व भविष्यकालीन शुभाकांक्षी प्रवृत्तींचा परिपाक आहे. म्हणून, आपल्या मनावरील पटलांचें तटस्थपणें निरीक्षण करून त्यांतील अनिष्ट वासना-भावनांची जाणीव झाल्यानें मनाची मलिनता निघून जाऊन माणसाचें जीवन संपन्न होणें हें शक्य आहे– हा कृष्णमूर्तींच्या विचारांतील भाग जरी पटण्यासारखा असला तरी, इष्ट भूतकालीन संस्कारांना व इष्ट अशा भविष्यकालीन ध्येयांना फांटा देऊन भूत-भव्यापासून मुक्त होणारें 'शांत' चित्त किंवा हृदय एकदम प्रेमादि भावनांना जन्म देऊं शकतें हा कृष्णमूर्तींच्या शिकवणुकीचा भाग स्वप्नाळु, अगम्य वाटतो.

कृष्णमूर्तींचा शास्त्रीय, तांत्रिक ( technical ), कारभारविषयक संघटना किंवा संस्था वगळून इतर सर्व प्रकारच्या सांस्कृतिक, शैक्षणिक संघटनांना कसा व कां विरोध आहे हें श्री. धोपेश्वरकरांनीं स्पष्ट केलें आहे. आधुनिक सत्ताबाज राजकारणाच्या सर्वंकष दडपणामुळें, सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक संस्थांतून व्यक्तींचें व्यक्तित्व खुरटून जातें या दृष्टीनें कृष्णमूर्तींचा आत्यंतिक संघटना-विरोध समजूं शकतो. परंतु व्यक्तित्वाचा विकासहि समाजसापेक्षच असतो. कृष्णमूर्तींचेंच एक सूत्र-वाक्य आहे: 'to live is to be related'- 'जगणें म्हणजे समाजाशीं संबद्ध राहूनच जगणें होय.' त्याचा आशय पाहतां, व्यक्तींनीं आपण होऊन स्वयंप्रेरणेनें केलेल्या सहकार्याधिष्ठित संघटनांना तरी कृष्णमूर्तींच्या विचारसरणींत स्थान मिळावें असें वाटतें.

कृष्णमूर्तींच्या विचारांतील दुर्बोध वाटणाऱ्या कांहीं स्थळांमुळें जे कांहीं उपरिनिर्दिष्ट प्रश्न निर्माण होतात ते गृहीत धरूनहि, प्रचलित वैचारिक परिस्थितींत कृष्णमूर्तींचा जीवनाकडे पहाण्याचा दृष्टिकोण व मार्ग (approach) हा अत्यंत आधुनिक व स्वतंत्र विचाराचें वारें खेळवून मनाला ताजेपणा व टवटवी आणण्याइतका सामर्थ्यशाली आहे असें मात्र वाटल्याशिवाय रहात नाहीं. आज मानव युगानुयुगें चालत आलेल्या भल्याबुऱ्या परंपरागत अंध संस्कारांच्या ओझ्याखालीं पिचून गेल्यासारखा झाला आहे. नाना धर्मसंप्रदाय, नाना तत्त्वज्ञानें, नाना पक्षोपपक्ष, नाना संस्था-संघटना व आधुनिक विज्ञानानें उपलब्ध करून दिलेलीं जगड्-व्याळ प्रचारसाधनें यांमुळें सामान्य माणसाची विचारशक्ति कुंठित होऊन गेली आहे. त्याबरोबरच आधुनिक वैज्ञानिक संशोधनामुळें त्याच्या जुन्या श्रद्धांना हादरा बसला असून, जीवनांतील वैचारिक शाश्वती निघून गेली आहे. असुरक्षितता, भीति, वैफल्य यांनीं त्याचें मन ग्रासलें आहे. व्यक्तित्व-विकासाची आंतरिक ज्योत मिणमिणती झाली असून जणूं मालवूं पहात आहे. या घोर परिस्थितीची



अनुक्रमणिका






जाणीव जगांतील विचारवंतांना झाली असून, माणसाच्या व्यक्तित्वाची कशी प्रतिष्ठापना करावयाची ही चिंता त्यांना व्यथित करीत आहे. युरोपमधील अलीकडील ( Existentialism ) सारखा माणसाचें व्यक्तित्व हिरिरीनें प्रस्थापित करूं पहाणारा विचार याच परिस्थितींतून उदयास आला असें समजलें जातें. याच परिस्थितीची प्रतिक्रिया व प्रतिकार म्हणून कृष्णमूर्तींच्या तत्त्वज्ञानाकडे पहाणें अर्थपूर्ण ठरेल असें वाटतें. त्या दृष्टीनें पहातां, माणसाच्या सर्व प्रकारच्या गुरु-शब्दप्रामाण्यांच्या कुबड्या काढून घेऊन त्याला स्वतंत्र विचारास प्रेरणा देणारें, मनाचे थराखालील थर निर्भयपणें उलगडून पहावयास प्रवृत्त करणारें, चित्ताच्या अथांग डोहावरील वरवर उसळणाऱ्या वासना-भावनादिकांच्या लहरींचें नृत्य तटस्थपणें गंमतीनें पहावयास लावून, आंतील गांभीर्य, शांति व प्रसन्नता यांचा लाभ करून देऊं पहाणारें कृष्णमूर्तींचें सामर्थ्यशाली तत्त्वज्ञान विशेषच अभ्यसनीय व मननीय ठरेल यांत शंका नाहीं.

—वि. म. वेडेकर

---

**विज्ञानछंद** ( मासिक ) : वि. द. आपटे, विज्ञानछंद कार्यालय, ३४१ सदाशिव, पुणें २, वर्ष १ अंक १ ला; वा. व. ५ रुपये.

" व्यावहारिक व प्रायोगिक शास्त्रज्ञान वा शिल्पज्ञान संपादन करण्याच्या सोयीसाधनांची " उणीव दूर करण्याच्या हेतूनें हें मासिक सुरूं करण्यांत आलें असून केवळ सुशिक्षितांनाच नव्हे तर अशिक्षित व नवशिक्षित जिज्ञासूंनाहि उपयुक्त व्हावें अशा प्रकारें त्याची योजना करण्यांत आली आहे. मासिकाचें स्वरूप आकर्षक असून लेखांची योजना सामान्य वाचकाला समजेल अशा प्रकारें करण्यांत आली आहे. भारतीय भाषांतून अशा प्रकारचीं नियतकालिकें जितकीं निघतील तितकीं हवींच आहेत. विज्ञानछंदाचें स्वरूप पाहतां तें यशस्वी होईल असा विश्वास वाटतो. आम्ही या नव्या मासिकाचें स्वागत करतों व त्यास सुयश इच्छितों.

—गोवर्धन पारीख

---

## साभार पोंच

१. **गारंबीचा बापू** – ले. श्री. ना. पेंडसे, प्रकाशक – मौज प्रकाशन ( प्रायव्हेट ) लिमिटेड, मुंबई ४.

२. **वाटचाल** – ले. रा. भि. जोशी, प्रकाशक- मौज प्रकाशन ( प्रायव्हेट ) लिमिटेड, मुंबई ४.

३. **माणसाच्या गोष्टी** – ले. अंबादास अग्निहोत्री, प्रकाशक – मौज प्रकाशन ( प्रायव्हेट ) लिमिटेड, मुंबई ४.

४. **विज्ञानछंद** – ( मासिक ) संपादक – वि. द. आपटे प्रका. विज्ञानछंद कार्यालय, पुणें २, वर्ष १ अंक १

५. **वेधशालापंचांगम्** – पंचवर्षीयं पंचांगम् – संवत् २०१२ – २०१७ रचयित्री वेधशालाविद्वत्- समितिः प्रका० वेधशालाविश्वस्त मंडल, भद्र, अहमदाबाद.

## ' नवभारत ' निधी

# – विनंति –

' नवभारत ' मासिक पुढें चालूं रहावें; त्याची कार्यक्षमता वाढावी, या दृष्टीनें त्यास कांहीं आर्थिक स्थैर्य लाभावें याकरितां किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां जें एक विनंति-पत्रक प्रसिद्ध झालें तें विदितच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, डॉ. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. स. का. पाटील, प्रा. घ. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिंदु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजी महाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळया भागांतील निरनिराळया क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

' नवभारत ' निधि पुढें येतें वर्ष चालूं राहणार आहे. मूळ विनंतिपत्रकांतील विनंतीस मान देऊन 'नवभारत'-निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, अशी आमची प्रार्थना आहे. नवभारत '-निधीस १०० रु. ची देणगी देणारास ' नवभारत ' मासिक दहा वर्षें मिळत राहील.

' नवभारत ' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें व पोहोंच ' नवभारता 'च्या दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

सप्टेंबर १९५६ नंतर पुढील देणग्या आल्या आहेत.

श्री. मा. सी. पेंढारकर, विलेपार्ले, मुंबई — २५ रु.
डॉ. जी. एम्. फडके, माटुंगा, मुंबई — १०० रु.

' नवभारत 'निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमलेली आहे : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख. प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर ( खजिनदार ), श्री. कृ. ना. फडके व श्री. मा. प. मंगुडकर ( संयुक्त कार्यवाह ).

' नवभारत ' निधिसमितीचें कार्यालय " C/o 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजीनगर पुणें ४ " येथें आहे. देणग्या, " खजिनदार नवभारत निधि समिति, ९०६ शिवाजीनगर पुणे ४ " या पत्त्यावर पाठवाव्यात अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** ( अध्यक्ष )

२५।१२।१९५६ **कृ. ना. फडके** }
पुणें ४ **मा. प. मंगुडकर** } कार्यवाह

# दि बँक ऑफ महाराष्ट्र लि०

## शेड्यूल्ड बँक : मुख्य कचेरी – पुणें २.

भांडवल ( ३१-१०-५६ )

| | | |
|---|---|---|
| वसूल भांडवल | रु. | १६,००,००० |
| गंगाजळी व इतर निधि | रु. | ८,७५,००० |
| खेळतें भांडवल | रु. | ७। कोटींचे वर |

- स्पेशल सेव्हिंग्ज डिपॉझिट योजना : व्याजाचा दर द. सा. द. शे. २
- रु. १०,००० व त्यावरील रकमा तीन महिने अगर अधिक मुदतीसाठीं आकर्षक व्याजाचे दरनें स्वीकारल्या जातात. व्याजाचे दरांसाठीं चौकशी करावी.
- मराठवाडा व विदर्भांतील जनतेचे सोयीसाठीं औरंगाबाद, जालना व नांदेड आणि अकोला येथें नवीन शाखा उघडण्यांत आल्या आहेत.
- हेड ऑफिस, डे. जिमखाना ( पुणें ), सोलापूर ( फलटण गल्ली ), नाशिक, अहमदनगर, श्रीरामपूर, किर्लोस्करवाडी व पनवेल येथें सेफ डिपॉझिट व्हॉल्टची सोय असून लॉकर्स उपलब्ध आहेत.
- लेटर्स ऑफ क्रेडिट उघडलीं जातात.

चिं. वि. जोग
मॅनेजर

---

# सांडू

## अनुभवसिध्द औषधें

**प्रेग-युटेरो**
गर्भिणी-गर्भ-रक्षक..

**बाळंत काढा नं. १, २ व ३**
बाळंतिणी करितां..

**बाळकडू**
तान्ह्या मुलांकरितां..

**बालामृत**
व्हिटॅमिनयुक्त मुलांचें टॉनिक.

**कुमारी आसव नं. ३**
मुलांचें लिव्हर टॉनिक..

ब्राह्मी तेलाचे कल्पक व संशोधक

**दत्तात्रेय कृष्ण सांडू ब्रदर्स**

चेंबूर प्रायव्हेट लि. चेंबूर – मुंबई ३८






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

Regd. No. B. 5177



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई